# विचारपोथी



विनोबा

ग्राम-सेवा-मंडळ, वरधा.

१९४६ ] [ मूल्य १।रु.

# निवेदन

चिंतना तून प्रयोग आणि प्रयोगा तून चिंतन अशी माझी जीवना ची घडण बसली आहे। ह्याला च मी निदिध्यास म्हणतो। निदिध्यासा तून विचार स्फुरत राहतात। ते टाचून ठेवण्या ची वृत्ति सामन्यतः मला होत नाही। पण मना च्या एका विशिष्ट अवस्थे त एकदा अशी वृत्ति अुगवली होती। सारे च विचार लिहीत नव्हतो। थोडे लिहीत होतो। त्या ची ही विचार-पोथी बनली आहे। सुदैवा ने ही प्रेरणा फार दिवस टिकली नाही। थोड्या च दिवसा त मावळली।

विचार-पोथी छापण्या ची कल्पना नव्हती। म्हणून च ती 'पोथी' ठरली। विचार हि बरेचसे स्व-संवेद्य भाषे त अुतरलेले। तथापि जिज्ञासू नी पोथी च्या प्रती लिहून घेणें आरंभिलें। अशा सुमारे दीड शे प्रती ह्या बारा वर्षा त लिहिल्या गेल्या असतील। पण सांप्रत काळी अशुद्ध लेखना चा आणि गचाळ अक्षरा चा प्रचार झाल्या मुळें, आणि मूळ प्रती चा आधार सर्व प्रतीं ना न मिळाल्या मुळें, अकेका प्रती त अपपाठ शिरत गेले। परिणामीं काही वचनें अर्थ-हीन झालीं। म्हणून शेवटीं ही छापील आवृत्ति काढावी लागली आहे.

हे विचार सुभाषिता सारखे नाहीत। सुभाषिता ला आकार लागतो। हे जवळ जवळ निराकार आहेत। ते सूत्रा सारखे हि नाहीत। सूत्रा ला तर्क-बद्धता पाहिजे असते। हे मोकळे आहेत। मग ह्यां ना काय नाव द्यावयाचें ?

मी ह्या ना 'अर्धवट पुटपुटणें' म्हणतों। ह्या विचारा ना सर्व श्रुतीं चें आलबन तर आहे च, तथापि ते आपल्या परी निरालब हि आहेत। ज्ञानदेवा ची परिभाषा योजिणे कृषमृय मानल्यास हा अेक वाचा-अृण फेडण्या चा प्रयत्न म्हणतां येअील।

परंधाम, पवनार
तारीख ३१-८-४६

विनोबा

# विचारांची वर्णानुक्रमणी

[ स्वर, अनुस्वार ( शुद्ध, वर्गीय आणि नासिक्य ), विसर्ग, व्यंजने असा क्रम आहे. क्ष क-वर्गात आणि ज्ञ द-वर्गात दाखल करून ळ लच्या पुढे दिला आहे आकडे विचारांचे आहेत ]

# विचार-पोथी

## — सूचि —

[ विशेषनामें, वचनें इत्यादिकाची सूचि । वचनें ग्रंथ वा ग्रंथकार ह्याच्याखालीं दिलेलीं आहेत । आंकडे विचाराचे आहेत ]

# विषयानुक्रम

# विचारपोथी

१

आध्यात्मिक व्यवहार म्हणजे स्वाभाविक व्यवहार म्हणजे शुद्ध व्यवहार.

२

हिंदुधर्माचें स्वरूप : आचार-सहिष्णुता, विचारस्वातंत्र्य नीतिधर्माविषयीं दृढता.

३

ग्रामाची सेवा, संताची सेवा, दुःखितांची सेवा आणि द्वेषकर्त्यांची सेवा ही सर्वोत्तम सेवा.

४

असत्यांत शक्ति नाहीं. आपल्या अस्तित्वासाठीं हि त्याला सत्याचा आश्रय घेणें भाग आहे.

५

सत्य, संयम, सेवा ही पारमार्थिक जीवनाची त्रिसूत्री आहे.

६

जीव —अशुद्ध, असिद्ध.

आत्मा—शुद्ध, असिद्ध.

ईश्वर —शुद्ध, सिद्ध.

७

ईश्वर, गुरु, आत्मा, धर्म आणि संत हीं पांच पूजास्थानें.

८

मला हिंदुधर्म कां प्रिय आहे ?

(१) असंख्य सत्पुरुष,

वामदेव, बुद्धदेव, ज्ञानदेव इ.

(२) अनेक सामाजिक व वैयक्तिक संस्था,

संस्कार आणि आचार;

यज्ञ, आश्रम, गोरक्षण इ.

(३) शाश्वत नीतितत्त्वें;

अहिंसा, सत्य इ.

(४) सूक्ष्म तत्त्वविचार;
भूतमात्रीं हरि इ.

(५) आत्मनिग्रहाचा शास्त्रीय उपाय;
योगविद्या.

(६) जीवन आणि धर्म ह्याची एकरूपता,
कर्मयोग.

(७) अनुभवसिद्ध साहित्य,
उपनिषद्, गीता इ.

९

ईश्वर शुभ हि नाहीं आणि अशुभ हि नाहीं. अथवा तो शुभ हि आहे आणि अशुभ हि आहे. अथवा तो केवळ शुभ आहे.

१०

अस्वाद-व्रतातली प्रगति कशी ओळखावी?

(१) प्रत्यक्ष-स्वाद-संशोधन.

(२) शारीरिक-स्वास्थ्य-संशोधन.

(३) कामक्रोधादि-विकार-संशोधन.

(४) अज्ञान-संशोधन.

११

ध्यान षड्विध :

(१) आत्मपरीक्षण (२) ईश्वरचिंतन

(३) वाक्यार्थानुशीलन (४) नामस्मरण

(५) भगवल्लीलावगाहन. (६) सच्चरित्रावलोकन.

१२

मंत्र 'राम-कृष्ण-हरि' राम—सत् कृष्ण—चित्. हरि—आनंद. माझे नाव मरो. रामनाम जगो. माझे काहीं च नसो. सर्व कृष्णार्पण असो. माझी इच्छा जावो. हरीची इच्छा राहो.

१३

सत्तेचा अभिमान, संपत्तीचा अभिमान, बळाचा अभिमान, रूपाचा अभिमान, कुळाचा अभिमान, विद्वत्तेचा अभिमान, अनुभवाचा अभिमान, कर्तृत्वाचा अभिमान, चारित्र्याचा अभिमान हे अभिमानाचे नऊ प्रकार आहेत. पण 'मला अभिमान नाहीं' असें भासणें ह्यासारखा भयानक अभिमान नाहीं.

१४

मी कामहत आहे. मला पूर्णकाम कर, निष्काम कर किंवा आत्मकाम कर पूर्णकाम करशील तर तुझ्या चरणी माझा प्राण वाहीन. निष्काम करशील तर बुद्धि वाहीन. आत्मकाम करशील तर तो काम च वाहीन.

१५

भजन—' ज्ञानदेव कृष्ण । गीता कृष्ण ' ह्याची चाल ' गोपाळ कृष्ण । राधा कृष्ण ' ह्या भजनाच्या चालीवर असावी. भजन करताना खालील ओवीतील अर्थाचें मनन असावें,—

तेथ भजता भजन भजावे । हे भक्तिसाधन जें आघवें ।
ते मी चि जालो अनुभवें । अखंडित ॥

१६

माझी एकादशी.—

१ अहिंसादि व्रते
२ ईशप्रार्थना
३ गीतार्थचिंतन
४ नित्ययज्ञ
५ सेवाधर्म
६ गोरक्षण
७ उपोपासना
८ मौनाभ्यास
९ मातृस्मरण
१० भारतनिष्ठा
११ आकाशसेवन

१७

आई, तूं जें मला दिलेंस तें कोणीं च दिले नाहीं, पण तू मेल्यानंतर जें देत आहेस ते तू हि जिवंतपणी दिले नाहींस. आत्म्याच्या अमरत्वाचा एवढा च पुरावा मला बस आहे.

१८

आमच्या आईची कांहीं वचनें :—

"विन्या, ज्यास्त मागूं नको. लक्षांत ठेव, थोडयात गोडी आणि फारात लबाडी"

"मनुष्यानें उत्तम गृहस्थाश्रम केला तर आईबापाचा उद्धार होतो. पण उत्तम ब्रह्मचर्य पाळलें तर बेचाळीस पिढ्या उद्धरतात."

"पोटभर अन्न आणि आंगभर वस्त्र ह्यापेक्षा अधिकाची गरज नाही."

"देवादिकांच्या किंवा साधुसंतांच्या गोष्टींशिवाय दुसऱ्या कोणत्या हि गोष्टी ऐकू नयेत."

"देशसेवा केली म्हणजे त्यांत देवाची भक्ति आली च. तरी पण थोडे भजन पाहिजे."

"अंत्यज कांहीं नीच नाहींत. देव नव्हता का विठ्यामहार झाला ? "

१९

इतिहास म्हणजे अनादिकाळापासून आतापर्यंतचें सर्व जीवन. पुराण म्हणजे अनादिकाळापासून आतापर्यंत टिकलेला अनुभवाचा अमर अंश.

२०

अनुभव तर्कातीत आहे. श्रद्धा अनुभवाच्या आधारानें राहणारी पण त्याच्या हि पलीकडची वस्तु आहे.

२१

मी कोठे राहू इच्छितो ? पहिलें उत्तर—'कोठें हि'. दुसरें उत्तर—'सत्संगतींत'. तिसरें उत्तर–'आत्म्यात'.

२२

वेद जंगल आहे. उपनिषदें गाई आहेत. गीता दूध आहे. संत दूध पीत आहेत. मी उच्छिष्टाची आशा राखून आहें.

२३

सुक्रातचें वचन आहे कीं 'पापमात्र अज्ञान आहे'. उलट पक्षीं असें हि म्हणता येईल कीं 'अज्ञान हें हि पाप च आहे'. गीता अज्ञानाला आसुरी संपत्ति म्हणते त्याचा अर्थ हा च आहे. दुसऱ्याच्या पापाकडे कशा दृष्टीनें पहावें हें सुक्रातचें वचन सांगते. स्वतःच्या अज्ञानाकडे कसें पहावें हें गीता सांगतें.

२४

आत्मविषयक अज्ञान हें प्राथमिक अज्ञान. आपल्या ठिकाणीं हे अज्ञान आहे ह्याची जाणीव नसणे म्हणजे तें 'अज्ञानाचे अज्ञान' किंवा गणिताच्या भाषेंत 'अज्ञानवर्ग' आपण ह्या 'अज्ञानवर्गात' सामील आहोत ह्या गोष्टीचा इनकार करणे म्हणजे 'अज्ञानघन'. ह्याला च 'विद्वत्ता' म्हणतात

२५

लाड करणारी आई असते म्हणून मुलाचे बोबडे बोलणे शोभते क्षमाशील परमेश्वर आहे म्हणून मनुष्याचे अज्ञान शोभते

२६

परिग्रहाची काळजी घ्यावी तर अंतरात्म्याचा अपमान होतो परिग्रहाची काळजी न घ्यावी तर विश्वात्म्याचा अपमान होतो. म्हणून अपरिग्रह सुरक्षित

२७

हा मुलगा लहानाचा मोठा 'मीं' केला. आणि बाकीचीं मुले ? 'देवाने मारलीं'—असे कसे म्हणता येईल ? दोन्ही फळें मी पत्करावीं किंवा दोन्ही देवावर सोंपवावीं. सतांनीं दुसरा मार्ग स्वीकारला. हिंमत असेल त्याने पहिला स्वीकारावा.

२८

" पापपुण्याची बुद्धि देव च देतो. त्याला आम्ही काय करणार ?"

" होय, त्याचें बरे-वाईट फळ हि तो च भोगतो आहे त्याला तरी तुम्ही काय करणार ?"

२९

कर्तृत्वहीनतेपेक्षा कर्तृत्व श्रेष्ठ. पण कर्तृत्वापेक्षां अकर्तृत्व श्रेष्ठ.

३०

पतिभावानें ईश्वराची भक्ति करणे ह्याला 'मधुरा भक्ति' म्हणतात मधुरा भक्ति म्हणजे ब्रह्मचर्य. कारण, मधुरा भक्ति करणारी व्यक्ति जर पुरुष असेल तर तिला आपला पुरुषभाव विसरवा लागेल. ती जर स्त्री असेल तर ईश्वराशिवाय कोणा हि पुरुषाविषयी तिच्या मनात पतिभाव राहणार नाही. पहिल्याचे उदाहरण शुकदेव. दुसऱ्याचे उदाहरण गोपी.

३१

साधन, तळमळ, अनुभव आणि उपकार.

३२

ज्याच्या कामक्रोधांचा जो विषय तो च त्याचा विषय.
" कामक्रोध आम्हीं वाहिले विठ्ठलीं ।"

३३

शिष्याच्या ज्ञानावर सही करणे एवढे च गुरूचें काम. बाकी शिष्य स्वावलंबी आहे.

३४

सेवा / अहंकार = भक्ति.

३५

आमची आई म्हणे, “ देशे काले च पात्रे च ’ हे एक थोतांड आहे. दयेनें वागावें म्हणजे झालें. ” मी म्हणे, “ अपात्रीं दान करण्यांत दान घेणाराचे हि अकल्याण आहे. ” ह्यावर तिचें उत्तर ठरलेलें होतें, “ पात्र-अपात्र आपण कोण ठरवणार ? जो गरज मागायला आला तो परमेश्वर च असतो. ”

३६

वर्तनाला बंधन असावें म्हणजे वृत्ति मोकळी राहते.

३७

गीतेंत हिमालय स्थिरतेची विभूति सांगितली आहे. ज्याची बुद्धि स्थिर आहे तो हिमालयांत च आहे.

३८

ज्यांनी रत्नाची लाखो रुपये किंमत ठरविली ते त्याचीं ‘ अमूल्यता ’ गमावून बसले संत खरे रत्नपारखी. कारण, त्यांनी रत्नाची अमूल्यता ओळखली.

३९

उपनिषदात 'आकाश-शरीर ब्रह्म' असे वचन आहे. भक्त भगवताला नीलवर्ण मानतात. दोहींचा अर्थ एक च. देवाच्या दर्शनाशिवाय डोळे कसे शात होतील ?

४०

शरीरनाश हा नाश च नव्हे. आत्मनाश होत च नाही. नाश म्हणजे बुद्धिनाश.

४१

सूर्याजीपासून मी दोर कापून टाकण्याचें तत्त्वज्ञान शिकलो. मला त्याचा अनेकवेळा उपयोग झाला आहे.

४२

सगीत आणि चित्रकला ह्याचा उपयोग काय ? सगीतानें भगवताचें नाम गावें. चित्रकलेनें भगवताचें रूप रेखाटावें.

४३

नामरूप मिथ्या असलें तरी भगवताचें नामरूप मिथ्या म्हणू नये.

४४

नीतींत काय येतें ?—नीतीत काय येत नाहीं, हा च सवाल आहे. 'निजों तरी जागे' हें अतिम नीतिसूत्र आहे.

४५

काम सपल्यानतरचे काम म्हणजे आनंद. ‘नीति जयाचिये जीए । लीलेमाजी ॥

४६

मला गीतेचा अर्थ थोडाफार समजू लागल्यानतर थोड्या दिवसानी माझी आई वारली म्हणजे मला गीतेच्या ओटीत घालून ती गेली आई गीते ! तुझ्या च दुधावर आतापर्यंत मी पोसलो आहे. आणि ह्यापुढे हि तुझा च आधार आहे

४७

प्रवृत्ति रजोगुण. अप्रवृत्ति तमोगुण. इकडे आड तिकडे विहीर

४८

ईश्वरानें आमच्या डोळ्याचा रंग हि आकाशासारखा निळा बनविला आहे. नीळकान्ताचें दर्शन हा च त्याचा उद्देश असला पाहिजे.

४९

कमल म्हणजे अलिप्त पवित्रता.

५०

भक्त नम्र असतो. त्याला देवाच्या ‘पायाचें’ दर्शन पुरेसे वाटते.

५१

दिवसभर काम करणाराला रात्रीची झोप जितकी अवश्यक आणि आनदकारक तितकी च जन्मभर मेहनत करणाराला शेवटची महानिद्रा अवश्यक आणि आनद-कारक आहे. मृत्य हे देवाचें सौम्यतम रूप आहे.

५२

सस्कृतात 'हन्' म्हणजे मारणे आणि 'हन्' म्हणजे गुणणें. हिंसेनें पापाचा गुणाकार होतो.

५३

शेवाळी पावुनि जन्म ओगळी।
त्रासला चिळसला जीव अतरीं ॥
राहिलो निराळा म्हणुनी तेथुनी ।
सवित्याचें मगल किरण सेवुनी ॥
मी अलिप्ततेचे गाणें गातसे ।
गा गा रे सखया तूही गा तसें॥

५४

घेऊनी वामनरूप भृग तो ।
येतसे लुटाया मजला धावुनी ॥
परि हृदयाचें बलिदान देउनी ।
जिंकिला कोंडिला केला गुग तो ॥
मी समर्पणाचे गाणे गातसें ।
गा गा रे सखया तूही गा तसें ॥

५५

संध्याकाळची प्रार्थना म्हणजे अतकाळचे स्मरण आहे.

५६

मी जेव्हां तुकोबासारख्यांच्या भावनेकडे पाहतो तेव्हा माझी भावना त्यांच्या पुढें काही च नाही असें मला दिसते. पण त्याला 'मी' काय करूं

५७

आत्मदर्शनाशिवाय आनद नाहीं. आईला मुलाचा चेहरा पाहून आनंद वाटतो ह्याचे कारण तिला त्या मुलांत आपला आत्मा दिसत असतो.

५८

अत्युत्तम कल्पनाचे विपर्यास अत्यंत हीन असतात. ताज्या फळासारखें आरोग्यकारक अन्न नाहीं, तर कुजलेल्या फळासारखें आरोग्यनाशक हि नाहीं.

५९

गंडकीच्या पाण्यांत राहून शालग्राम वाटोळा गुळगुळीत होतो, पण भिजत नाहीं. तसें सत्संगतींत राहून आम्ही सदाचरणी होऊं, पण एवढें बस नाहीं. भक्तीनें भिजलें पाहिजे.

६०

स्वार्थ बोलून चालून नागडा आहे. मुख्य, परार्थापासून जपावयाचे आहे.

६१

गीता अनासक्ति सांगते. पण ईश्वरांत आसक्त हो म्हणते च.

६२

हिरण्यकशिपूची आज्ञा प्रह्लादानें मानली नाहीं, ह्यांत विशेष नाहीं. व्यासांचा त्याग शुकाला करावा लागला, ह्यात विशेष आहे.

६३

स्वदेशी हे भूतदयेचे शास्त्र आहे. स्वदेशी म्हणजे ममता नव्हे.

६४

बुद्धि आणि भावना ह्यांचा जेथें मेळ दिसत नाहीं तेथे इंद्रियनिग्रहाचा अभाव असतो.

६५

परा भक्ति म्हणजे समता, म्हणजे आत्मज्ञान, म्हणजे निर्विकारता.

६६

सगुण निर्गुण एक च आहे जी वस्तु एका अर्थाने सगुण ती च दुसऱ्या अर्थाने निर्गुण होऊ शकते तसे च उलट. उदाहरणार्थ, लोकसेवा सगुण आणि आत्मोद्धार निर्गुण हे हि खरे आहे आणि ह्याच्या उलट हि खरे आहे

६७

सूर्यग्रहणात जर दु:खाचे कारण नाहीं, कारण त्यात पृथ्वी आणि सूर्य ह्याच्या दरम्यान चद्र येण्यापेक्षा अधिक कांहीं च नसते, तर मनुष्याने पाण्यात बुडत असताना ओरडण्याचें हि कारण नाहीं, कारण तेथें मनुष्याचें नाक आणि बाहेरची हवा ह्यांत पाणी येण्यापेक्षा अधिक कांहीं च नसते.

६८

सगुण उपासनेत नम्रता आहे. निर्गुण उपासनेंत ज्ञानाची जबाबदारी आहे आणि म्हणून ‘ क्लेश अधिक ’.

६९

आपल्या अन्नवस्त्रादि प्राथमिक गरजाचा भार दुसऱ्यावर टाकणारे गुलाम किंवा लुटारू लोक ‘ राष्ट्र ’ ह्या संज्ञेस पात्र नाहींत.

७०

'देशे काले च पात्रे च' हा न्याय स्वतःस हि लागू आहे.

७१

अज्ञानातून ज्ञान उत्पन्न होऊ शकत नाहीं.

७२

दुर्बलाचें 'बलिदान' नव्हे. बलिदान बलवंताचें.

७३

'बलिदान' म्हटले म्हणजे बलीची आठवण होते. बलिदान म्हणजे आत्मसमर्पण.

७४

कर्म करीन तर फळ हि घेईन हा रजोगुण. फळ टाकीन तर कर्म हि सोडीन हा तमोगुण. दोन्ही एक च.

७५

'यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः।' कारण, लोकांना सेवक हवा असतो तो भक्त मिळतो. भक्ताला सेव्य हवे असतात ते लोक मिळतात.

७६

रात्रीं कुत्रे भूंकू लागले त्यामुळें झोप बिघडून भल्या गृहस्थाला 'दुःख' झालें. पण त्या भुंकण्यामुळें आलेले चोर पळून गेले असें दुसऱ्या दिवशीं सकाळीं समजलें, तेव्हां 'सुख' वाटलें.

७७

ब्रह्मचर्य हे पारमार्थिक साधन आहे. ब्रह्मचर्याश्रम ही परमार्थानुकूल सामाजिक संस्था आहे.

७८

युरोपमध्यें विभक्तराष्ट्र-पद्धतीचा प्रयोग चालला आहे. हिंदुस्थानांत संयुक्तराष्ट्र-पद्धतीचा.

७९

अकर्तृत्वाशिवाय अहिंसा-सत्यादि व्रताचें पूर्ण पालन अशक्य आहे.

८०

ऐश्वर्य हा ईश्वराचा विशेष गुण आहे. भक्ताचें ते अभिलषित नाहीं.

८१

सत्याची व्याख्या नाहीं. कारण, व्याख्येचा च आधार सत्यावर आहे.

८२

छातीवर पिस्तुल रोखून धान्य लुबाडणे आणि सोन्याची मोहोर देऊन ते विकत घेणे ह्यांत पुष्कळवेळां मुळीं च फरक नसतो.

८३

‘ सम-लोष्टाश्मकाञ्चनः ’ हें खऱ्या अर्थशास्त्राचे मुख्य सूत्र आहे.

८४

धर्म हा संसारातून मोक्षाकडे नेणारा पूल आहे. त्यामुळें त्याचा एक पाय संसारात आणि एक पाय मोक्षात असतो.

८५

सर्व धर्म सत्याचे अंशावतार आहेत.

८६

सूर्यनारायण सत्यनारायणाची प्रतिमा आहे. सूर्योपासना सत्यदर्शनासाठीं आहे.

८७

जगण्याच्या इच्छेंत मरणाचें बीज आहे. ती इच्छा गेली म्हणजे मरण मेलें.

८८

'अहं ब्रह्मास्मि' मध्ये 'तत् त्वमसि' चा निषेध नाहीं.

८९

अहम् । सोऽहम् । नाहम् ।

९०

आधीं ज्ञान, मग कर्म आणि शेंवटीं भक्ति असा माझा अनुभव. ह्याहून निराळा हि अनुभव असू शकेल. तिन्ही एकरूप आहेत.

९१

व्यक्तांतल्या ज्ञानी सोबत्यापेक्षां अव्यक्तांतला श्रद्धाळु सोबती श्रेष्ठ. धर्मराजाबरोबर कुत्रा गेला, पण अर्जुन पडला.

९२

सेवा जवळून, आदर दुरून, ज्ञान आंतून.

९३

गंगा कधीं गढूळ असते, कधीं स्वच्छ असते. पण नेहमीं पवित्र असते. आत्मा गंगेसारखा सदा पवित्र आहे. त्याच्या पवित्रतेचा आधार त्याच्या अखंड वाहण्यावर आहे.

९४

राम मर्यादाभूमि. कृष्ण प्रेमसमुद्र. हरि जें कांहीं उरलें तें—अनंत आकाश.

९५

कृष्ण जिवत असताना उद्धवाला त्याचा वियोग क्षणभर सहन होत नसे. पण कृष्ण मेल्यावर तो त्याचा वियोग पचवूं शकला. अर्जुन कृष्णाच्या जिवतपणीं त्याचा वियोग सहन करी, पण मेल्यानतर तो तळमळू लागला.

९६

ध्यानापेक्षा कर्मफलत्याग श्रेष्ठ म्हटला. कारण, ध्यानांत हि सूक्ष्म स्वार्थ असू शकतो.

९७

स्थूल विकार म्हणजे पक्का खडक. तो भक्तीच्या झऱ्याला तोंड च फुटू देत नाहीं स्थूल विकार जिंकले म्हणजे भक्तीचा उगम होतो. पण भक्तीचा उगम झाला तरी सूक्ष्म विचार उरतात च. कच्च्या खडकातून झरा वाहत राहतो. त्यामुळे आवाज होतो. ती च 'तळमळ'. सूक्ष्म विकार हि नाहींसे झाले म्हणजे तळमळ गेली. ही परा भक्ति.

९८

'त्याचा मी' ह्या अनुभवात अहंकार नाहीं, पण परोक्षता आहे. 'माझा मी' ह्या अनुभवात परोक्षता नाहीं, तर अहकार आहे.

९९

‘भूतीं देव’ दिसूं लागेल तेव्हां संत सेवेसाठीं कां तळमळतात त्याचें रहस्य समजेल.

१००

ज्ञानदेवांच्या ठिकाणीं गुरुभक्तीचा उत्तम विकास झाला त्यामुळें त्याना सृष्टि गुरुरूप दिसू लागली त्यातून त्याना दृष्टान्त मिळाले. ज्ञानदेवाची मानलेली काव्यस्फूर्ति त्याच्या गुरुभक्तीचा नैसर्गिक परिणाम होय.

१०१

जेव्हां ‘इन्द्राय तक्षकाय स्वाहा’ हा न्याय वापरला जातो, तेव्हां इंद्र तर मरावयाचा नसतो च, पण तक्षक मात्र अमर होऊन बसतो.

१०२

आईला मुलाच्या सर्व दोषासकट मुलगा गोड वाटतो. तसें भक्ताला ब्रह्माच्या सर्व उपाधींसकट—जगासकट—ब्रह्म गोड वाटतें.

१०३

स्वधर्म सहजप्राप्त असतो. मुलाला दूध पाजण्याचा धर्म आई मनुस्मृतीतून शिकत नाहीं.

१०४

आत्मे सगळे च आहेत. पण आत्मवान् एखादा.

१०५

श्रुतीला द्वैताचा इतका कटाळा कीं आत्म्याचे बहुरूपत्व दाखवितांना हि तिनें दोनाचा पाढा वगळला आहे. "स एकधा भवति, त्रिधा भवति, पञ्चधा, सप्तधा, नवधा...."

१०६

गाढ झोपेत विचारांचा विकास झाल्याचा मला पुष्कळवेळा अनुभव येतो. पेरलेलें बीं मातीनें झांकलें म्हणजे लोपलेसे भासतें, पण विकसत राहतें. तसें च हें दिसतें.

१०७

कोशांतील सर्व शब्दाचा 'ईश्वर' हा एक च अर्थ आहे

१०८

विभूति म्हणजे ईश्वराचे चिन्त्य भाव. ते अनुकरणीय असतील च असें नाहीं.

१०९

विरोधी भक्तीचे तीन प्रकार आहेत:—

(१) नैष्ठिक नास्तिकता, (२) नैष्ठिक आसक्तता, (३) नैष्ठिक नीतिहीनता.

११०

एक मार्ग — पुण्याने पापनाश,

अनासक्तीनें पुण्यनाश.

दुसरा मार्ग—पापानें पुण्यनाश,

अनुतापानें पापनाश.

भक्त आणि शाक्त.

१११

कामक्रोधाना आपआपसात लढवून मारणें ह्यांत ज्ञानाचे कौशल्य आहे.

११२

क्रोध देवावर, क्रोध आपल्यावर, क्रोध क्रोधावर.

११३

'अन्तिम' ध्येय-वाद म्हणजे पुरुषार्थहीनता. 'अन्तिक'-व्यवहार-वाद म्हणजे हीन पुरुषार्थ.

११४

एक कबीरपथी साधु म्हणाला—"मी 'ओम्' ओळखत नाहीं, 'सोम्' (सोऽहम्) ओळखत नाहीं नि 'बोम्' ओळखत नाहीं."

ठीक आहे. तू ओम् ओळखत नसलास तरी ओम् तुला ओळखतो आहे.

११५

'अद्वैत'-भूमिकेवर पर-परीक्षण हि आत्म-परीक्षण च होते. कारण, त्या वेळीं रेड्याच्या पाठीवरचे वळ हि आपल्या पाठीवर उमटत असतात.

११६

प्रार्थना कर्तव्य, सूत कातणें कर्तव्य आणि जेवण हि कर्तव्य. तिन्ही यज्ञार्थ समजून च करतों. पण पहिलीं दोन कर्तव्यें करण्यात जो मोकळेपणा वाटतो तो तिसरें कर्तव्य करतांना वाटत नाहीं.

११७

विचार पुढे धावतो आहे. आचार मागे रेगाळतो आहे. पण तो विचाराच्या दिशेने चालला आहे. इतका तरी बचाव आजपर्यंत होता. आता तो हि उरला नाहीं. कारण, विचार इतका पुढें धावला आहे कीं त्याची दिशा हि दिसेनाशी झाली आहे. अशा स्थितींत देवाच्या दयेशिवाय बचाव नाहीं.

११८

'ब्रह्मचर्य आणि अहिंसा ह्यांना गीता शारीर तप कां म्हणते ?'

कारण, काम-क्रोधाचे वेग निदान शरीराच्या बाहेर पडणार नाहींत इतकी तरी किमान जतबीज गीतेला हवी आहे.

११९

चित्रकाराला स्वतः काढत असलेल्या चित्राची हि जवळून नीट कल्पना होत नाहीं त्यासाठीं त्याला मुद्दाम दूर जाऊन पहावे लागते. तटस्थवृत्तीशिवाय सृष्टिरहस्य उकलणे शक्य नाहीं

१२०

शत्रूवर प्रेम करणे सुरक्षित आहे

१२१

प्राप्त झालेल्या कशा हि परिस्थितीचे भाग्य बनविण्याची कला भक्ताजवळ असते. 'अवघीं भाग्यें येती घरा। देव सोयरा झालिया.'

१२२

गंगेचे पाणी गडव्यांत घालून तो गडवा सीलबंद करून पूजेसाठीं देव्हाऱ्यात ठेवतात. आत्मा ह्या गंगेच्या गडव्या-सारखा आहे. परमात्मा गंगानदीसारखा आहे. दोघांची पापनिवारक शक्ति सारखी. तापनिवारक शक्तींत अंतर आहे.

१२३

आत्मदर्शन म्हणजे मोक्षाची चव चाखून पाहणें. परमात्मदर्शन म्हणजे मोक्षाचे पोटभर जेवण. पहिली गोष्ट 'या च देहीं या च डोळा' अनुभवता येईल. दुसरी देहपातानंतर

१२४

गोपाळ कृष्णा ! माझा अहकार कालिया आहे. त्याचे डोके ठेचशील तेव्हा कालिय-मर्दनाच्या कथेवर माझा विश्वास बसेल.

१२५

ससाराचीं तीन लिंगें .—
अहकार पुल्लिंग, आसक्ति स्त्रीलिंग, असत्य नपुसक.

१२६

बुडत्याशीं सहानुभूति म्हणजे त्याच्याबरोबर बुडणें नव्हे, पण स्वत. तरून त्याला वाचविण्याचा प्रयत्न करणें.

१२७

वृत्ति निर्भय करण्याला प्राणजयाच्या प्रयत्नाचा उपयोग होऊ शकतो.

१२८

अर्जुनाच्या रोमरोमातून 'कृष्ण कृष्ण' हा एक च ध्वनि निघत होता. म्हणून लोकानीं त्याचे नाव कृष्ण ठेवले. गीतेचा श्रोता वक्ता तो च.

१२९

चार महावाक्यात उत्तरोत्तर चढत्या चार अद्वैत-भूमिका सुचविल्या आहेत :—

प्रज्ञान ब्रह्म — अद्वैतज्ञान
अयमात्मा ब्रह्म— ईश्वरसाक्षात्कार
अहं ब्रह्मास्मि— आत्मानुभव
तत् त्वमसि— विश्वोद्धार

१३०

हिंदुधर्मात सबंध समाजचे समाज निवृत्त-मांस दिसून येतात. ही एक त्या धर्माची विशेषता मानता येईल. पण ती भूतदयेला प्रेरक व्हावी, भेदबुद्धीला पोषक होऊ नये, एवढी काळजी अगत्य आहे.

१३१

अस्तेयाने मी जग जिंकतो. अपरिग्रहाने तें सोडतो.

१३२

'घरच्या घरीं करी चोरी। तो एक मूर्ख' असे रामदासाचे एक वचन आहे कोणता हि चोर 'घरच्या घरी च' चोरी करीत असतो म्हणून 'तो एक मूर्ख'.

१३३

सिंह हिंसक असल्यामुळे त्याला मागे वळून पहावें लागते. अहिंसकाला सिंहावलोकनाचे कारण नाहीं.

१३४

तेज आणि क्षमा ह्या एकमेकाच्या व्याख्या आहेत.

१३५

जर आणि जेव्हां दुसऱ्याची सेवा घेण्यात माझे कल्याण असेल, तर आणि तेव्हा माझी सेवा करण्यात दुसऱ्याचे हि कल्याण असेल आणि असें च उलट पक्षीं.

१३६

लहानपणापासून मला मुरली जितकी गोड लागते तितके दुसरे वाद्य गोड लागत नाहीं. मुरली आमचे राष्ट्रीय वाद्य आहे. गरिबापासून श्रीमतापर्यंत सर्वांना लभ्य आहे. रात्रींच्या शात वेळीं दुरून मुरलीचा ध्वनि कानावर पडला कीं भगवताच्या दिव्य चरित्राचें स्मरण होतें.

१३७

कासवाप्रमाणे कर्मयोगात शात पण निश्चित पावलें टाकावीं.

कासवाप्रमाणे मजबूत पाठ करून जगाचे आघात सोसावे.

कासवाप्रमाणें विषयांपासून इद्रिये आवरावीं.

कासवाप्रमाणें दृष्टि प्रेमानें भरलेली असावी.

१३८

ज्यांना लोकसग्रह करण्याची हौस वाटते त्याना योग्यता नसते, आणि ज्याना योग्यता असते त्याना हौस वाटत नाहीं. लोकसग्रहाला ह्या पेचातून देवाने च सोडवावें !

१३९

सात्त्विक आहारांत हि जो स्वाद उत्पन्न होतो ती हिसा.

१४०

वेद ज्याला ॐ म्हणतात तो सतांचा राम. 'राम-कृष्ण-हरि' ह्या त्याच्या च तीन मात्रा समजाव्या.

१४१

ज्याचें 'भूतमात्रीं हरि' हे सूत्र सुटले त्याचा देव हरवला.

१४२

स्मर्तव्याची विस्मृति हे मानसिक आळसाचें लक्षण आहे.

१४३

स्वधर्माविषयीं प्रेम, परधर्माविषयीं आदर आणि अधर्माविषयीं उपेक्षा मिळून धर्म.

१४४

रामाच्या पायाचा स्पर्श अयोध्येपासून लंकेपर्यंत असंख्य दगडांना झाला असेल, पण त्यातून 'अहल्या शिळा' च तेवढी उद्धरली. तसे च अहल्येला हि असंख्य लोकांचे पाय लागले असतील, पण रामाच्या च पादस्पर्शाने ती जागी झाली सर्वांनी संताच्या वाटेंत दगड होऊन पडावें. मग 'अहल्या-राम' न्यायाने ज्याचा जेव्हा उद्धार होणार असेल तेव्हां होईल.

१४५

शिक्षण-शास्त्राने 'अहल्याराम-न्याय' घोकून ठेवावा, म्हणजे अहंकार नाहींसा होऊन त्याची दृष्टि निवळेल.

१४६

आत्मसंतोष आणि अल्पसंतोष ह्यांत अंतर आहे. पहिली आध्यात्मिक वस्तु आहे. दुसरी व्यावहारिक आहे. ती चांगली किंवा वाईट हि असू शकेल. चांगली असल्यास आध्यात्मिकतेला पोषक होईल.

१४७

देव खरा आहे. धर्म खरा आहे. संत खरे आहेत कारण, सत्य खरें आहे. तो च देव, तो च धर्म आणि ते च संतांचें स्वरूप.

१४८

असत्यांतून सत्यात, अधारातून प्रकाशात, मृत्यूतून अमृतात हें साधकाचें उत्तरायण.

१४९

श्रुति ब्रह्म च सागते आणि श्रुति च ब्रह्म सागते असा माझा श्रुतीविषयीं दुहेरी विश्वास आहे.

१५०

आपण साधनेची काळजी करावी. सिद्धीची काळजी करण्यास साधना समर्थ आहे, किंवा ह्याचा च अर्थ, ईश्वर समर्थ आहे

१५१

विरक्ताच्या निष्ठुरतेत जो प्रेम पाहतो आणि आसक्ताच्या प्रेमांत जो निष्ठुरता पाहतो तो च पाहतो.

१५२

सामुदायिक साधनेत व्यक्तिगत साधनेचा कस पडताळून पाहतां येतो, आणि मनाचे कोनेकोपरे झिजण्याला मदत होते.

१५३

मला बाहेरून किती मिळालें आणि माझे स्वतःचे आंतलें किती, हें मी पाहतो तेव्हां माझें स्वतःचें असें काहीं च उरत नाहीं. 'इद न मम' ही भावना करण्याचें मला कारण च नाहीं.

१५४

माझी त्रयी—आई, गीता, तकली.

१५५

वैदिक ऋषि जेव्हा 'मला तांदूळ पाहिजे, मला गहू पाहिजे, मला मसूर पाहिजे' इत्यादि म्हणतो, तेव्हा त्याच्या 'मी' मध्यें त्रिभुवनाचा समावेश झालेला आहे.

१५६

टेकडीसारखा उच्च होण्याची मला मौज वाटत नाहीं. माझी माती आसपासच्या जमिनीवर पसरली जावी ह्यात मला आनंद आहे.

१५७

जाणत्याने जड होऊन रहावे असे शास्त्र सांगते जड होऊन राहणें म्हणजे कर्मांत वागणे.

१५८

तपांत तीन वस्तु आहेत ' (१) चित्तशुद्धि (२) निर्माण शक्ति आणि (३) ज्ञान तप करताना शेवटच्या दोहोंविषयीं अनासक्ति असेल तर तिन्ही लाभतील.

१५९

इतिहासाचें अध्ययन म्हणजे आपल्या पूर्व जन्मांची पाहणी.

१६०

डबक्यातले किंवा समुद्रातले विवाह चागले नाहींत विवाहाला नदी पाहिजे.

१६१

प्रेमानें च ठसा. बरा कीं वाईट नीतीअनीतीवर.

१६२

ज्ञान हें हि ज्ञानगम्य आहे. म्हणजे अगाऊ ज्ञान असेल तर पुढे ज्ञान मिळावयाचे.

१६३

असत्कर्माचे डोके मारावे सत्कर्माला घायाळ करावे. सत्कर्माला घायाळ करण्याची युक्ति म्हणजे च फलत्याग.

१६४

प्राप्तीपेक्षा प्रयत्नाचा आनद विशेष आहे.

१६५

आग्रह महत्त्वाची शक्ति आहे. किरकोळ कामात वापरून टाकणे बरें नाहीं.

१६६

उन्मनीपलीकडचे स्वैर मन ही सहजावस्था.

१६७

सकाळचा तेवढा रामप्रहर, आणि बाकीचे काय हरामप्रहर आहेत? भक्ताला सर्व काळ सारखा च पवित्र असला पाहिजे.

१६८

पूर्वीची तपश्चर्या न गमावता पुढें पाऊल टाकणें हे सुधारकाचे काम आहे.

१६९

अकरण, निषिद्ध, काम्यकर्म, फलाभिसंधि आणि अहंकार ह्या पांच वस्तूंचा त्याग करणे ह्याचें नांव संन्यास तो च योग.

१७०

आहार-विधान . ( १ ) यज्ञ-शेष, ( २ ) सात्त्विक, ( ३ ) परिमित, ( ४ ) अस्वादवृत्तीने, ( ५ ) देवाला अर्पण करून, खावें.

१७१

कर्म सोडणें अशक्य आहे. कारण सोडणें हें हि कर्म आहे.

१७२

'सन्यास घेणे' ह्याला कांहीं च अर्थ नाहीं. कारण, सन्यास म्हणजे च 'न घेणे.'

१७३

सत्कर्म आचरून त्यातून फळ काढूं पाहणें म्हणजे गंगेंत बुडी मारून गाळ उपसण्यासारखें आहे.

१७४

'पुढे' 'मागे' हीं अव्ययें मराठी भाषेत दिग्दर्शक असून कालदर्शक आहेत. ह्या अव्ययाशीं समानार्थक असलेलीं कोणत्या हि भाषेतील अव्ययें अशीं च उभयदर्शक आहेत. ह्यावरून मनुष्याच्या मनाचा कल सहजस्फूर्तीनें दिक् आणि काल एकरूप मानण्याकडे दिसतो.

१७५

'जगाच्या पूर्वी काय होते ?'
ह्या तुझ्या प्रश्नाचा अभाव होता.

१७६

एक रज्जु-सर्पाला भिऊन पळ काढतो. दुसरा रज्जु-सर्पाला धोपटत सुटतो अर्थ एक च.

१७७

जगांत देव सापडत नसेल, तर बाहेर सापडण्याची आशा नको.

१७८

जगामुळें 'जगाच्या', डोळ्यामुळें 'रूपाचें', बुद्धी-मुळें 'ज्ञान', आत्म्यामुळे 'होते'.

१७९

'आत्म्याचे अस्तित्व' हे शब्द पुनरुक्त आहेत. कारण, आत्मा म्हणजे च अस्तित्व.

१८०

देवा मला भुक्ति नको, मुक्ति नको—भक्ति दे. सिद्धि नको, समाधि नको—सेवा दे.

१८१

धुमसत असताना प्रगट करू नये. पेटल्यावर दिसेल च.

१८२

विद्युत्स्फुरण हे साधकाला आश्वासन आहे. तेवढ्यावर विसबू नये. सूर्यप्रकाश लाभेपर्यंत प्रयत्न चालू ठेवावा.

१८३

अमूर्त आणि मूर्त ह्यामधील एक च साधा—शब्द, म्हणजे वेद, म्हणजे नाम.

१८४

विद्यार्थ्यांच्यापासून मी जितके शिकलो त्या मानानें मीं त्याना काहीं च शिकविलें नाहीं.

१८५

“नको” नको.

१८६

भक्ताला ‘स्वारब्ध’ नाहीं

१८७

स्वतंत्रतादेवीचा उपासक पोपटाला पिंजऱ्यात ठेवू शकणार नाहीं.

१८८

पौर्णिमेला कृष्णाचा मुखचंद्र पहावा अमावास्येला कृष्णाची अंगकांति पहावी.

१८९

कोणी कर्मयोगाला पिपीलिका आणि ध्यानयोगाला विहंगम म्हणतात. मी कर्मयोगाला इसापनीतींतल्या कासवाची आणि ध्यानयोगाला सशाची उपमा देतों. ध्यान करतां करता केव्हां झोप लागते, हे ध्यानात येत नाहीं.

१९०

"काय रे ! तुला झोप लागली का?" एक म्हणतो, 'नाहीं, अजून लागली नाहीं', दुसरा म्हणतो, 'होय, केव्हा च लागली.' ॐ म्हणा कीं नेति म्हणा. अर्थाचा नकार च आहे.

१९१

जग माझी प्रत्यक्ष सेवा करीत आहे. आणि मी मात्र जगाच्या सेवेचें नाव घेत आहे. अजामिळपापी नारायणाच्या नामाने उद्धरला. तसा सेवेच्या नांवावर च माझा उद्धार व्हावा असा ईश्वरी संकेत दिसतो. नाममहिमा अगाध आहे

१९२

अद्वैत-'वाद' म्हणजे अचूक द्वैतसिद्धि.

१९३

स्वप्न म्हणजे झोपेंत जागणें. आणि अनवधान म्हणजे जागृतींत निजणे. पुष्कळवेळा हीं एकमेकांचीं कार्यकारणे असतात.

१९४

पादसेवन-भक्ति म्हणजे सर्व भूताची सेवा. 'पादोऽस्य विश्वा भूतानि।'

१९५

'निमित्तमात्र भव सव्य-साचिन् ।' निमित्तमात्र होणें म्हणजे अहंकार सोडून देवाच्या हातांतलें हत्यार बनणें. म्हणजे, उजवा हात थकला तर डाव्या हातानें लढण्याची तयारी राखणें.

१९६

भक्त संसार, साधन आणि सिद्धि तिन्ही देवावर सोपवितो.

१९७

आधि, व्याधि, उपाधि, समाधि—हें उपसर्ग-चतुष्टय.

१९८

शून्यता = एकता = अनंतता.

१९९

स्वरूप, विश्वरूप, अरूप—हीं देवाचीं तीन रूपें.

२००

वेद-प्रामाण्य म्हणजे नीतिधर्माची नित्यता

२०१

मला संतांचीं वचनें पूज्य आहेत, माझ्या कल्पना प्रिय आहेत, सत्य प्रमाण आहे. माझ्या कल्पनाप्रमाणें मला वागणें भाग आहे. कारण, स्वधर्म अबाध्य आहे.

पण संतांचा आधार हि मी सोडूं शकत नाहीं. म्हणून माझ्या कल्पनांचा संतांच्या वचनांशीं मेळ घालण्याचें कर्तव्य मला प्राप्त होतें. सत्यधर्मावर दृष्टि स्थिर असल्यामुळें असा मेळ घालणे मला जड जात नाहीं. सत्यसूर्याच्या प्रकाशांत संतांच्या मार्गावरून माझ्या कल्पनांच्या पायांनीं चालण्याचा मी प्रयत्न करतो.

२०२

साधना कोठपर्यंत करावी ?

आपोआप ' होऊं ' लागेपर्यंत.

२०३

हिमालय उत्तरेस कां आहे ?

मीं त्याला उत्तरेस राहूं दिलें आहे म्हणून. मी उद्यां त्याच्या उत्तरेस जाऊन बसलों म्हणजे तो दक्षिणेकडे फेकला गेला च.

२०४

साधकानें स्वप्नावर हि चौकी राखली पाहिजे. आत्मसंशोधनाला त्याचा फार उपयोग आहे. हरिश्चंद्राचें उदाहरण.

२०५

निराहार, अल्पाहार, सहजाहार.

२०६

'दुःखमित्येव' त्याग योग्य नाहीं 'दुःखमिति' त्याग योग्य असूं शकेल.

२०७

सर्वधर्मान् 'परि'-त्यज्य मामेकं शरणं 'व्रज'। ही 'परिव्राजका' ची भगवतानीं व्याख्या केली आहे'

२०८

कोणी म्हणतात, 'मनुष्य म्हणजे साधनवान् प्राणी' मी म्हणतो, 'मनुष्य म्हणजे साधनावान् प्राणी'

२०९

सृष्टि म्हणजे एक अन्योक्ति आहे. दिसायला सृष्टि आणि असायला देव.

२१०

देह —शव<br>
आत्मा—शिव<br>
जीवन—श्मशान.

२११

आपण सताच्या चरित्राचें नव्हे, पण चारित्र्याचें अनुकरण केलें पाहिजे.

२१२

काव्याचे हेतु—

(१) हरीचें यश गाणें. (३) कर्तव्याची दिशा दाखविणें.

(२) जीवनाचा अर्थ करणें. (४) चित्ताचा मळ धुणें.

२१३

जी वाणी सत्याला सभाळते त्या वाणीला सत्य सभाळते.

२१४

उपपत्ति, प्रतीति आणि प्रीति, किंवा ऐकणे, पाहणें आणि जेवणें.

२१५

संतानी मोक्ष हि तुच्छ केला, त्यात दोन उद्देश आहेत

(१) मोक्षाची विकृत कल्पना काढून टाकून तिला उजळा द्यावयाचा. आणि

(२) साधनेचे गौरव करावयाचें.

२१६

पुराणकारानीं काल्पनिक देव उभे करून त्याची स्तुति केली. काल्पनिक राक्षस निर्माण करून त्याची निंदा केली. अशा रीतीनें मनुष्याचें नाव वगळून 'न म्हणे कोणासी उत्तम वाईट' हें सूत्र सभाळलें आणि परभारे नीतिबोधाचें कार्य साधले. हे देव आणि राक्षस आमच्या च हृदयांत राहत आहेत, एवढें आम्हीं ओळखले पाहिजे.

२१७

एखादा नाटककार जसा स्वत: नाटक रचून त्या नाटकाच्या प्रयोगात हि स्वत. सामील होतो, तसे ईश्वराचे आहे. ईश्वर विश्वरूप नाटक रचून त्यांतला आत्म्याचा पार्ट स्वतः करीत असतो 'तत् सृष्ट्वा तदेवानुप्राविशत् ।'

२१८

मनुष्य आणि पशु ह्याच्यातील मुख्य विशेष वाणीचा आहे. जर पशूच्या ठिकाणी मनुष्यासारखी वाणी कल्पिता आली तर त्या च क्षणीं त्याच्या ठिकाणी मनुष्यासारखा विचार हि कल्पिता येईल. म्हणून वाणी पवित्र राखणे हें मनुष्याचे स्वाभाविक कर्तव्य आहे.

२१९

वानप्रस्थाश्रम म्हणजे अनुभव, स्थिरवृत्ति आणि इंद्रियनिग्रह.

२२०

आत्मप्रयत्न, वृद्धाचा आशीर्वाद, संताची संगति, गुरुकृपा आणि ईश्वराची इच्छा हीं परमार्थाचीं साधकें आहेत.

२२१

ईश्वराची सत्ता म्हणजे आत्म्याची अमरता, म्हणजे धर्माची नित्यता, म्हणजे जीवनाची आनंदमयता

२२२

‘अर्धोन्मीलित दृष्टि’ म्हणजे
‘आत हरि’ बाहेर हरि’
‘ब्रह्म-कर्म समाधि’
‘त्यक्तेन भुञ्जीथाः।’
‘कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।’
‘जाणोनि नेणते करीं माझें मन।’
‘सत हस गुन गहहिं पय,
परिहरि बारि बिकार॥’
‘स्याद् वा न स्याद् वा।’
‘अद्वैत–भक्ति’

२२३

प्रार्थनेंत डोळे मिटावे तर झोप लागते, उघडावे तर एकाग्रता बिघडते. म्हणून अर्धोन्मीलित दृष्टि राखावी.

२२४

घराला आग लागली आहे, आणि लोक काय म्हणतील म्हणून ओरड करीत नाहीं. झाला तरी लोक काय म्हणतील ?

२२५

व्यासांनीं विष्णुसहस्रनाम लिहिलें त्यात आधीं ॐकाराचा उच्चार केला आहे. ॐ हे विष्णुसहस्रनामाचें अतिसंक्षेपरूप आहे.

२२६

'अहम्' ही आत्म्याची खूण आहे.

'अ ह' म्हणजे 'न हन्यते' असा मी अर्थ करतो

२२७

मुक्त रामात रमतात

मुमुक्षु रामात मरतात

मुमुक्षूंच्या ह्या रामनामाला 'उलटा जप' म्हणतात.

२२८

मनुष्य जागून थकला म्हणजे निजतो, आणि निजून थकला म्हणजे जागतो. रजस् आणि तमस् हीं एकमेकाचीं प्रतिफलितें आहेत.

२२९

गायत्रीमंत्र व्यक्तिगत उपासनेचा मानलेला आहे. पण 'धीमहि'–आम्ही ध्यान करतो–हें बहुवचनी पद समुदायाचें सूचक आहे. म्हणजे गायत्रीउपासना व्यक्तीने करावयाची आहे, पण ती आपल्या ठिकाणीं सर्व समुदायाची-विश्वात्म्याची-कल्पना करून करावयाची आहे.

२३०

पाश्चात्त्य भाषांत 'संतांचे अनुवर्तन' असा प्रयोग आढळून येतो आपल्या इकडे 'संतांचे गुणगान' म्हणतात. 'गुणगान' म्हणण्यांत नम्रता आहे पण त्यांत 'अनुवर्तन' गृहीत असेल तर च ती नम्रता शोभेल.

२३१

ईश्वर आदर्शमूर्ति :

ध्येय, गेय, अनुकरणीय.

२३२

आमच्यापाशीं पांच इंद्रियें असल्यामुळें 'आमच्या' जगांत पांच विषय आहेत वास्तविक, जगांत अनंत विषय आहेत, अथवा मुळीं च नाहींत.

२३३

'कला म्हणजे काय' असा प्रश्न विचारला जातो. वास्तविक, कला कोणाची किंवा कशाची असा प्रश्न विचारला पाहिजे. उत्तर—'आत्म्याची' अर्थात् अमर, अर्थात् अतीन्द्रिय पण बुद्धिग्राह्य. बुद्धीच्या पलीकडे अकल आत्मा. कृति कला नसते. कृतींत कला असते अथवा नसते. मारुति जेव्हां एकेक मोती फोडून त्यांत 'राम' दिसतो का म्हणून पाहत होता, तेव्हां तो त्यांत आत्म्याची 'कला' दिसते का म्हणून पहात होता.

२३४

सात्त्विकता दोन प्रकारची असते : कर्तरि आणि कर्मणि. कर्तरि म्हणजे आपला जोर चालविणारी. कर्मणि म्हणजे प्रवाहांत वाहणारी कर्तरि सात्त्विकता परमार्थोपयोगी आहे. कर्मणि सात्त्विकता संसार बरा करते

२३५

" आत्मा कशानें सिद्ध होतो ? " ह्या तुझ्या प्रश्नानें सिद्ध होतो

माझें हें उत्तर तुला पटले, तर त्या पटण्यानें सिद्ध होतो.

न पटले, तर त्या न पटण्यानें सिद्ध होतो.

२३६

राजर्षि म्हणजे राजकारण परमार्थमय करणारा. ' राजकारण ' हे जीवनाचे उपलक्षण समजावयाचे आहे.

२३७

सात प्रमाणे :

(१) कालात्मा (२) स्व-बुद्धि (३) अक्षिपुरुष (४) सूर्यनारायण (५) शब्दब्रह्म (६) सत्यधर्म आणि (७) परमेश्वर.

ह्याचे स्पष्टार्थ—

(१) काल अनंत आहे हे विसरूं नये.

(२) आपली बुद्धि सांगेल त्याप्रमाणें करावें.

(३) प्रत्यक्ष कृतींत उतरेपर्यंत प्रयत्न सोडूं नये.

(४) मन मोकळें करावें.

(५) संतांचीं वचनें घोकावीं.

(६) सत्य आचरण्याचा प्रयत्न करावा

(७) ईश्वराची करुणा भाकावी.

२३८

सत्संगति हें माझ्या सर्व साधनेचें मूळ आहे. तत्त्वनिष्ठा विरुद्ध सत्संगति असा प्रश्न उत्पन्न झाला—जें अशक्य आहे—तर तत्त्वनिष्ठा सोडून हि सत्संगति पत्करण्याकडे मनाचा कल व्हावा इतकी सत्संगतीविषयीं आसक्ति वाटते.

२३९

कोणी म्हणतात, 'ईश्वर अज्ञेय आहे.' जर अज्ञेय, तर आहे कशावरून ? जर आहे, तर अज्ञेय कसा ?

२४०

प्रकृतीच्या हेतूप्रमाणें आईचा मुलावर आणि बापाचा मुलीवर परिणाम व्हावयास पाहिजे. आत्मा हा केव्हा हि अपवादक आहे च.

२४१

कर्म ज्ञानाचें पेटवण आहे ज्ञानाग्नि अखंड पेटत ठेवण्यास कर्मरूप पेटवण अखंड पुरवले पाहिजे.

२४२

आमचें शब्दप्रामाण्य म्हणजे ऋषींचें प्रत्यक्ष. म्हणून शब्दप्रमाण हि अनुभवाच्या कसाला लावून पाहणें योग्य आहे.

२४३

सत्य = धर्म = ब्रह्म.

२४४

'न तद् भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः'

सूर्य – प्रत्यक्ष ( चक्षुः )

शशांक – अनुमान ( मन. )

पावक – शब्द ( वाक् )

२४५

आत्मदर्शन हें जीवनातलें काव्य होय.

२४६

फळ तुला आधींच मिळून चुकले आहे. आतां कर्तव्य करण्याचे बाकी उरलें आहे. पुन्हां फळ कसलें मागतोस ?

२४७

विश्व—प्रत्यक्ष-ब्रह्म. ईश्वर—अनुमान-ब्रह्म.

वेद—शब्द-ब्रह्म. आत्मा—ब्रह्म.

२४८

अ-पासून ज्ञ-पर्यंत सर्व अक्षरे ब्रह्माचीं प्रतीके आहेत. पण 'अ' आणि 'ज्ञ' ह्या विभूति आहेत. 'ब्रह्म अ-ज्ञ आहे' अशी उपासना करावी. ह्या उपासनेने भक्त नम्र होईल.

(१) अ-ज्ञ म्हणजे अनासक्त ज्ञान

(२) अ-ज्ञ म्हणजे वाङ्मय-मूर्ति

(३) अ-ज्ञ म्हणजे निर्गुण आणि सगुण दोन्ही

(४) अ-ज्ञ म्हणजे नेणता. हा तर अर्थ प्रसिद्ध च आहे.

२४९

अपरिग्रहाची कातरी ज्ञानाला हि लावली पाहिजे. व्यर्थ भाराभर ज्ञानाचा परिग्रह करणें योग्य नाहीं.

२५०

आत्मा शक्यता-मूर्ति आहे. आत्म्याला अशक्य असें कांहीं नाहीं.

२५१

'सायन्स' ची किती हि सूक्ष्म दुर्बीण घेतली तरी आत्म्याचा आवाज ऐकण्याच्या कामीं ती निरुपयोगी आहे.

२५२

पहिले मंगल कोणते ?—भगवान् विष्णुः
दुसरें मगल ?—गरुडध्वजः
तिसरे मंगल ?—पुण्डरीकाक्षः
चवथें मंगल ?—विष्णुसहस्रनाम पहा

२५३

तप आणि ताप ह्यातील विभाजक रेखा ओळखणें जरूर आहे.

२५४

अखंड ईश्वरस्मरण म्हणजे अखंड कर्तव्यजागृति.

२५५

ईश्वरशरणतेची मूर्ति फलत्याग.

२५६

मी असें पाहतों कीं माझी देवाविषयीं जितकी भक्ति, त्यापेक्षां देवाची माझ्यावर कृपा अधिक आहे.

२५७

अभ्यास आणि वैराग्य हीं एका च वस्तूचीं विधायक आणि निषेधक अंगे आहेत.

२५८

पहिलें दर्शन—नृसिंह देव.

दुसरें दर्शन—नृसिंह, प्रह्लाद दोघे देव.

तिसरें दर्शन—नृसिंह, प्रह्लाद, हिरण्यकशिपु तिघे देव.

चवथें दर्शन—नृसिंह, प्रह्लाद, हिरण्यकशिपु तिघांच्या हि पलीकडे देव.

२५९

मला स्वधर्म च आचरणीय का ?

ममतेमुळें नव्हे, किंवा परधर्माहून तो श्रेष्ठ म्हणून हि नव्हे, तर माझा त्यात च विकास आहे म्हणून.

२६०

गुण किंवा दोष 'सहकुटुंब सहपरिवार येऊन कार्यसिद्धि' करीत असतात.

२६१

सुताराला ज्याप्रमाणें भूमितीच्या सिद्धान्ताचें भय वाटतें, तसें सेवकाला किंवा साधकाला अहिंसादि व्रताचें भय वाटावें.

२६२

कमींत कमी परिग्रहांतून ज्यास्तींत ज्यास्त कस कसा काढावा हें अपरिग्रह शिकवतो.

२६३

श्रद्धा + प्रज्ञा + वीर्य = सत्य.

२६४

कल्याण सार्वजनिक आहे ते व्यक्तीचे राखीव असू शकत नाहीं.

२६५

आधीं प्रेम, मग त्याग, शेवटीं शांति.

२६६

सत्य म्हणजे सर्व गुणांचा 'गुण्या'

२६७

भक्तापाशी ज्ञान नसलें तरी नम्रता असल्यामुळें ज्ञान मिळवणे त्याला सहज आहे.

२६८

शरीर निसर्गतः जसजसे जीर्ण होत जाईल तसतशी प्रज्ञेची कला वाढत जावी. आणि ज्या क्षणीं शरीर पडेल त्या क्षणीं प्रज्ञेची पौर्णिमा असावी. ह्याला गीता शुक्ल पक्षातलें मरण म्हणते उलट पक्षीं, शरीराबरोबर प्रज्ञा क्षीण होत जाऊन मरण येणें हें कृष्ण पक्षातलें मरण होय.

२६९

ज्ञानेश्वरी तुम्हांला किती प्रिय आहे ?

—इतकी की दोष दाखवावयाचे झाले तरी ज्ञानेश्वरीतले दाखवतो.

२७०

दंभ सूक्ष्म आहे. तो ज्ञात रूपाने च राहतो असें नाही. अज्ञात रूपानें हि राहू शकतो. पुष्कळवेळां मनुष्य न कळत हि दंभ करीत असतो.

२७१

'स्वप्न काय दाखवतें ?'—

१ सृष्टीचे मिथ्यात्व.

२ कल्पनेचे कर्तृत्व.

३ साधनेचे अपूर्णत्व.

२७२

व्यष्टीचें नीतिशास्त्र समष्टीला लागू होत नसेल तर अद्वैत-सिद्धान्त मिथ्या समजावा लागेल.

२७३

१ शब्दानंद

२ कल्पनानंद

३ अनुभवानंद

४ श्रद्धानंद

२७४

पाण्यापेक्षा रक्त ‘ घट्ट ’ असेल, पण पाण्याची पवित्रता पाण्याला च.

२७५

माझ्यांत असलेले गुण माझ्यांत आहेत म्हणून दुसऱ्यात असावे अशी इच्छा होते. माझ्यांत नसलेले गुण माझ्यांत नाहींत म्हणून दुसऱ्यात असावे अशी इच्छा होते

२७६

गुरूचा शोध करण्याची अवश्यकता नाहीं कारण, गुरु स्वतः च शिष्याचा शोध करीत आहेत. शिष्याची योग्यता मिळवणे एवढें च आपले काम आहे. किंवा ह्याचें च नांव गुरूचा शोध करणें, असे हि म्हणतां येईल.

२७७

ज्ञानदेव योगी खरे, पण त्याच्या योगाचा भक्तीला ‘ साष्टांग ’ प्रणाम आहे.

२७८

देवावर विश्वास म्हणजे जगावर विश्वास, म्हणजे आत्म्यावर विश्वास म्हणजे सत्यावर विश्वास.

२७९

सर्व प्रवृत्तींचें फल शून्य आहे. कारण, आदौ जसे होतो तसें अतीं होणे एवढी च सारी निष्पत्ति आहे.

२८०

ध्यानाला आसन विचाराला चलन

२८१

वैदिक ऋषींना आत्मस्तुतीचा संकोच वाटत नाहीं आत्मरूप झालेले ऋषि आत्मस्तुति न करतील तर काय अनात्म-स्तुति करतील ?

२८२

तुकोबांना शिव्या देण्याची वाईट खोड होती असा त्यांच्यावर आक्षेप आहे. आक्षेप खरा आहे. पण मला त्यांत तुकोबाच्या अहिंसेची पराकाष्ठा दिसते.

२८३

कर्तव्य आणि आनंद एकरूप होणे ही अद्वैताची एक व्याख्या आहे. पण असे जोंपर्यंत झाले नाहीं तोपर्यंत कर्तव्याला चिकटून असावे ह्यात कल्याण आहे.

२८४

सर्व साहित्याच्या अभ्यासानें किंवा सर्व विश्वाच्या विज्ञानानें जें समाधान लाभणार नाहीं तें आत्म-संशोधनानें लाभतें.

२८५

सद्भावानें साधनेचे नाटक केलें तरी चालेल.

२८६

"कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ" करून नरदेहाच्या साहाय्याने आपले सर्व देह कापून काढावयाचे आहेत.

२८७

रात्रीचा अंधार चिंतनाला अनुकूल आहे. त्याचा हेतु च तो आहे. निजण्यापूर्वी थोडा वेळ चिंतन करणें उपयुक्त आहे. चिंतनात संबंध दिवसातील वर्तनाचे परीक्षण, झालेले दोष पुन्हां न होऊ देण्याचा संकल्प आणि त्यासाठीं ईश्वराची प्रार्थना ह्या तीन वस्तु अवश्य असल्या पाहिजेत चिंतनाचे वेळीं शक्य तर ध्रुवाचे दर्शन घ्यावे ध्रुव निश्चयाची देवता आहे

२८८

जप म्हणजे आंत न मावणाऱ्या निदिध्यासाचे प्रगट वाचिक रूप, अशी माझी जपाची व्याख्या आहे.

२८९

दैव अनुकूल करण्याला साधनें कोणती ?

—(१) प्रयत्न, (२) प्रार्थना.

२९०

रात्रीं मी मौन राखतो त्यामुळें की काय कोण जाणे, अंधार माझ्याशीं बोलतो. तो म्हणतो, " माझ्यामधून

तुझा जन्म आहे. माझ्यात च तू लीन होणार आहेस. आज हि तुझ्यावर माझी च सत्ता आहे ”

२९१

नम्रतेच्या उचीला माप नाहीं

२९२

गुरु तीन प्रकारचे असतात—

(१) ‘ अधिकार तैसा ’ उपदेश करणारे

(२) उपदेशाचा पाऊस पाडणारे

(३) मौनाने उपदेश करणारे

२९३

वेदार्थ स्वच्छ समजत असेल, घटकाभर समाधि लागत असेल, नामस्मरणानें सात्त्विक भाव उमटत असतील म्हणून काय झाले ? आचरणात उतरेल ते च खरें.

२९४

जबाबदारीचें काम मला मिळाले तेव्हांपासून मी जबाबदारींतून सुटलो.

२९५

आपण वैदिक ऋषींचा आधार घेतों. वैदिक ऋषि त्यांच्या पूर्वींच्या ऋषींचा आधार घेतात. ह्यावरून “ ज्ञान अनादि आहे ” एवढा च निष्कर्ष समजावयाचा.

२९६

रावण—रजोगुण

कुंभकर्ण—तमोगुण

बिभीषण—सत्त्वगुण

२९७

परमार्थ कठिण म्हटला तर आम्ही भीतीने घर च सोडीत नाहीं, सोपा म्हटला तर बाजारात विकत घ्यायला धावतो.

२९८

कोणत्या तरी नित्य यज्ञाशिवाय राष्ट्र उभे राहू शकणार नाहीं.

२९९

दुःखें सहन करणें हा तितिक्षेचा आरंभ आहे. तितिक्षेची कसोटी सुखे सहन करण्यात आहे.

३००

मराठी साहित्याचा जन्म हि ॐकारांतून च आहे. ॐकाराच्या साडे तीन मात्रांना अनुलक्षून ज्ञानदेवाची साडे तीन चरणी ओवी निर्माण झाली आहे.

३०१

आरसा पाहण्यासाठीं आरसा ही एक तऱ्हा, आणि मुख पाहण्यासाठीं आरसा ही दुसरी तऱ्हा. तसें वेदज्ञानासाठीं

वेदाभ्यास ही एक तऱ्हा, आणि आत्मज्ञानासाठीं वेदाभ्यास ही दुसरी तऱ्हा. ह्या दुसऱ्या तऱ्हेला "स्वाध्याय" म्हणतात.

३०२

मननाची उणीव अधिक श्रवणानें भरून निघणार नाहीं.

३०३

जें कर्म बद्धलायास, ते सात्त्विक कर्म नव्हे. आणि स्वकर्म तर नव्हे च नव्हे.

३०४

स्वधर्म किंवा स्वत ची मर्यादा सोडून सेवेचा लोभ धरण्यांत अवांतर हानि काय असेल ती असेल च, पण ज्या सेवेचा लोभ धरला ती सेवा च नीट होत नाहीं ही आपत्ति आहे.

३०५

बुद्धीचा सदुपयोग – सत्त्वगुण
बुद्धीचा दुरुपयोग – रजोगुण
बुद्धीचा अनुपयोग – तमोगुण

३०६

गगा आपल्या नियत मार्गानें वाहते म्हणून तिचा लोकाना ज्यास्तीत ज्यास्त उपयोग होतो. पण अधिक उपयोगी पडण्याच्या लोभानें जर ती आपला नियत मार्ग सोडून लोकाच्या अगणांतून वाहू लागली तर लोकांची काय दशा होईल ?

३०७

समुद्राच्या लाटांची अखड खळबळ चाललेली असते, आणि बरोबर च अखड जप : ॐ! ॐ! ॐ!

'मामू अनुस्मर, युद्धय च'

३०८

"समोरचा दिवा आहे हें जसें निश्चित, तसे देव आहे हे तुम्ही निश्चित मानतां का?"

—देव आहे हें मी निश्चित मानतो समोरचा दिवा आहे च अशी मी हमी घेऊ शकत नाहीं

३०९

शकुंतलेच्या चरित्रात शिक्षण आणि पूर्वसंस्कार ह्याचा झगडा दाखविला आहे.

३१०

काव्याचा नायक म्हणून कोणी व्यक्त नसतो काव्यातील सर्व व्यक्तींची सामुदायिक अव्यक्त योग्यता हा च काव्याचा नायक.

३११

विचारहीन जीवन
विचारमय जीवन
विचार – जीवन
निर्विचार जीवन.

३१२

पारमार्थिक पुरुषाच्या दक्षतेत उदासीनता असते आणि उदासीनतेत दक्षता असते.

३१३

दक्षः—कर्मयोगी

उदासीनः—ज्ञानी

दक्ष उदासीनः—भक्त

३१४

जो गुरु असेल तो शिष्य असेल च. जो शिष्य नसेल तो गुरु नसेल च

३१५

गुरूला शिष्याविषयीं पूज्यभाव असला पाहिजे. कारण, शिष्यत्व हें गुरुत्वाला मातृस्थानीं आहे.

३१६

जगाकडे पाहताना आदर, प्रेम किंवा करुणा ह्यांशिवाय चौथी भावना का उत्पन्न व्हावी?

३१७

जवळच्यांना दोष माहीत असल्यामुळें ज्याचा जवळच्यावर प्रभाव पडत नाहीं, त्याचा दूरच्याना दोष माहीत नसल्यामुळें दूरच्यांवर जो प्रभाव पडल्यासारखा दिसतो तें मृगजळ होय. मृगजळ दुरून च पहावें.

३१८

रोजची झोप हा मृत्यूचा 'पूर्व-प्रयोग' आहे असे समजून शास्त्रांत सांगितलेल्या प्रयाण-पद्धतीचा झोपेच्या वेळीं अभ्यास करावा.

३१९

समोरच्या झाडाच्या पानात जो वेदमंत्र वाचूं शकतो त्याला वेद समजला

३२०

आधीं आत्म्याला कोणी पाहू शकत नाहीं. पाहूं शकला तर तो वाक्-शक्ति गमावून बसतो, बोलू शकत नाहीं. बोलणारा मिळाला तर ऐकणारा मिळत नाहीं आणि कौतुकानें ऐकणारा मिळाला तरी समजण्याच्या नावानें शून्य च.

३२१

ज्ञान्याला ह्या जगात जगायची हि सोय नाहीं, आणि मरायची हि सोय नाहीं. म्हणून तो केवळ शरीरानें जगून मनानें मरतो.

३२२

प्रेम आणि वैराग्य ह्यांचा मेळ घालणे विवेकाचें काम आहे.

३२३

जागृतींत मनाच्या तीन अवस्था मी अनुभवतों.

(१) भाविकता

(२) नैतिकता

(३) शून्यता

३२४

'असभूति'—कुवासनाची अनुत्पत्ति आणि विनाश.

'सभूति'—सद्भावनाची उत्पत्ति आणि विकास.

३२५

उत्तराभिमुख कां?

ऋषींचें स्मरण. शिवाय हिमालय आणि ध्रुव ह्यांचें चिंतन (आम्ही हिंदुस्थानांत आहों हे गृहीत धरून.)

३२६

भक्ताला कर्मयोगाची गोडी वाटते. कारण, त्यांत त्याची उपासनेची भावना असते.

३२७

कर्मठ उपासनेचे हि 'कर्म' करतो. भक्त कर्माची हि उपासना बनवितो

३२८

परकाया-प्रवेश म्हणजे दुसऱ्याचें मानस-शास्त्र समजणें.

३२९

अहंकाराला वाटतें, 'मी' नसलों तर जगाचें कसे चालेल ? वस्तुस्थिति अशी आहे कीं मी च काय पण सबंध जग नसले तरी जगाचे चालण्यासारखे आहे.

३३०

स्वकर्मांतली उपासनेची दृष्टि चुकली तरी स्वकर्म अभ्युदय साधील, उपासनेची दृष्टि टिकली तर प्रत्यक्ष मोक्ष मिळवून देईल.

३३१

आत्मा एक. माया शून्य. एक आणि शून्य ह्यांच्या संयोगानें असंख्य जग. ही च लिंगोपासना.

३३२

" माझ्या स्थितींत तुम्ही काय कराल ?"

" तूं करतोस तें च. कारण, तुझ्या 'स्थितींत' तुझी 'बुद्धि' आली च."

३३३

बुद्धि-गत ज्ञान म्हणजे 'परोक्ष' ज्ञान. ते च इंद्रियांत उतरले म्हणजे 'अ-परोक्ष' म्हणावयाचे.

३३४

सप्तर्षींच्या आकृतींत काश्मीर आणि हिमालयाचा भाग मला दिसतो. हें भारताचे उपलक्षण समजून ऋषींच्या स्मरणाबरोबर ‘दुर्लभ भारते जन्म’ ह्या ऋषिवचनाचे मी स्मरण करतो.

३३५

ज्ञानावस्थेत हि भेदाची कल्पना करणे म्हणजे रजोगुणाची कमाल होय.

३३६

जो बलवान् तो बाल. उच्चातलें उच्च ध्येय ज्याला अशक्य वाटत नाहीं तो बाल.

३३७



३३८

जो ईश्वराचा क्रोध ओळखतो तो क्रोध-रहित होतो. जो ईश्वराची क्षमा ओळखतो तो क्षमावान् होतो.

३३९

आधुनिक विज्ञान म्हणते, सात वर्षांच्या श्वासोच्छ्वासाने काया पालटते.

धर्मशास्त्र म्हणतें, बारा वर्षांच्या तपश्चर्येनें चित्त धुऊन निघतें.

अध्यात्म म्हणते, ब्रह्मज्ञानानें एका क्षणात जीव मुक्त होतो.

३४०

मेघागमनानें हृदय उचबळून येते ह्याचें कारण ' नभासारिखें रूप या राघवाचे ' हें च नव्हे काय ?

३४१

आत्मौपम्य सत्य. 'तुलनात्मक मानसशास्त्र' मिथ्या.

३४२

सेवा करताना 'अ-कृत'-भावना असावी. सेवा घेताना 'कृत-ज्ञ'-भावना असावी.

३४३

ज्यानीं ज्ञान आचरणात आणलें त्यांनीं देव 'मूर्तिमंत' केला.

३४४

सत्त्वगुण निरहंकाराने 'निःसत्त्व' केला म्हणजे परम-श्रेयोरूप होतो.

३४५

देहबद्ध पुरुष इंद्रियें नसतीं तर गुदमरून गेला असता. मुक्ताला इंद्रियांची आवश्यकता नाहीं. घराचें खिडक्यांवाचून चालणार नाहीं. शेताला खिडक्या कशाला ?

३४६

शरीरातील सर्व क्रिया एका अर्थानें प्राण-क्रिया च आहेत पण वाचिक क्रिया हा प्राणक्रियेचा विशेष अर्थ आहे. म्हणून प्राणायामाचें रहस्य वाक्संयमात आहे.

३४७

१ श्रवणमननादि
२ शमदमादि
३ यज्ञादि
४ प्राणायामादि
५ भजनादि

हे साधन—पंचक

३४८

परमार्थरूप बर्फीचे कर्म वजन आहे, बुद्धि गोडी. वजनापेक्षा गोडी श्रेष्ठ, पण म्हणून वजन त्याज्य नव्हे.

३४९

मौनाचे अर्थ—

(१) वाक्–संयम

(२) सत्य–संग्रह

(३) शक्ति–संचय

(४) ध्यान–साधन

३५०

भगवत्–प्राप्त्यर्थ प्रवृत्त झालेला, भगवंतानीं स्वमुखानें गाइलेला, प्रह्लादादि परम भागवतानीं आचरलेला तो 'भागवत धर्म'

३५१

संन्यास ही नोट आहे

कर्मयोग नाणे आहे.

किंमत एक च.

३५२

बुद्धीनें कळते, पण धृतीशिवाय वळत नाहीं.

३५३

मर्यादेच्या पोटचा अभिमान शोभतो. उपयुक्त हि आहे. कारण, अविकृत आहे.

३५४

'पत्' म्हणजे पडणे ह्यावरून 'पति' हे शब्द श्रुति लावते. पाणिनि 'पा' म्हणजे पाळणें ह्यावरून हे शब्द लावतो. पहिली आध्यात्मिक निरुक्ति आहे, दुसरी शाब्दिक व्युत्पत्ति.

३५५

नारळाप्रमाणे बाहेर विरक्ति आणि आत भक्ति असेल तेथे च प्राप्ति.

३५६

अद्वता, अस्मिता आणि एकता स्वत:सिद्ध आहेत.

३५७

पांच उपासना—

(१) प्रियोपासना
(२) सत्योपासना
(३) समोपासना
(४) ज्ञानोपासना
(५) शान्तोपासना

३५८

व्हानपणीं कोणी शिव्या दिल्या कीं त्याला म्हणावें, 'माझा तुला शिव्या देण्याचा हुकूम आहे'. जर त्याने शिव्या देण्याचे सोडून दिले, तर आपलें काम झाले. तसें च चालविले, तर आपल्याला हुकूम मानणारा एक चाकर मिळाला. ज्ञानी पुरुषाची अशी बालवृत्ति असते. ह्याचे च नाव 'नराणां च नराधिपः'

३५९

नीतितत्त्वाचा आधार ज्याने ईश्वरावर ठेवला त्याने खोल पायावर इमारत रचली.

३६०

ईश्वराचे पृथक्करण—मंगल भाव.

३६१

आकार म्हणजे विकाराचा स्फोट.

३६२

गृहस्थ शिक्षक होऊ शकत नाहीं. कारण, तो अन्य कर्तव्यांनी बांधलेला आणि उच्च ध्येयाला हि अपुरा पडतो. संन्यासी आदर्श शिक्षक होऊ शकेल, पण तो जगाच्या मालकीचा, विद्यार्थ्यांच्या 'हातचा', नव्हे. म्हणून वानप्रस्थ हा च विद्यार्थ्यांच्या मालकीचा शिक्षक उरतो.

३६३

दोन धर्मांचा कधीं हि झगडा नसतो. सर्व धर्मांचा अधर्माशीं झगडा आहे.

३६४

जगात केवळ देवाची इच्छा आहे. आणि ज्याची इच्छा देवाच्या इच्छेत मिसळून गेली त्याची आहे.

३६५

सत मोक्षस्पर्शी वैराग्य बाळगतात म्हणून त्याच्या सगतीने जगाला ससार-साधक सयम लाभतो. सूर्य उष्णतेने जळत आहे म्हणून आमच्या देहात ९८ अश उष्णता राहते.

३६६

चेतनासारखे चेतन असून जडाचा मोह राखणे किंवा जड-हत होणे ह्याला काय म्हणावे?

३६७

खरे अर्थशास्त्र, खरे आरोग्य-शास्त्र, सर्व ‘खरीं’ शास्त्रें मोक्षानुकूल आहेत.

३६८

सृष्टि म्हणजे देवाची आरती. पूजा यथासाग होऊन चुकली आहे. आपला नमस्कार तेवढा बाकी उरला आहे.

३६९

काल, आज आणि उद्या ह्याचा आत्मा हा एक च साधा आहे.

३७०

देवाच्या प्रेमळ स्वभावामुळे देव जगत्-पति.
सताच्या पुरुषार्थामुळे देव सत्-पति.
माझ्या प्रार्थनेमुळें देव मत्-पति.

३७१

भवभूति म्हणतो, "फुलाचें स्थान पायाखालीं नाही, मस्तकावर आहे."

मस्तकावर खरे. पण आपल्या नव्हे. वृक्षदेवतेच्या.

३७२

आजपर्यंत मेलो नाहीं म्हणून ह्यापुढें हि मरणार नाहीं, असें अनुमान करू नको. आजपर्यंत मेलो नाहीं म्हणून च ह्यापुढें मरावें लागणार आहे, असे अनुमान कर.

३७३

यज्ञ 'इष्ट'-काम-धुक् आहे, अनिष्ट काम पुरवणारा नाहीं.

३७४

'विश्वनाथ' हा देवाचा धंदा. 'दीन-नाथ' हा धर्म.

३७५

माझें काहीं नाहीं.
सर्व माझें आहे.
मी सर्वांचा आहें

३७६

प्रत्यक्ष तत्त्वे सोडून मानीव लोक-संग्रहाच्या पाठीस लागूं नये.

३७७

त्यागानें पापाचे मुद्दल फिटतें. दानाने पापाचें व्याज चुकतें.

३७८

गीतेंत सांगितलेलें " अशास्त्र-विहित घोर तप " कोणतें?—विषयासक्त संसार.

३७९

अर्थ म्हणतो, 'हक्काचे रक्षण करणे हे कर्तव्य आहे' धर्म म्हणतो, 'कर्तव्य करीत राहणें हा हक्क आहे.'

३८०

साधन अल्प असो, पण उत्कटता तारील.

३८१

कर्माचीं नियामकें—
(१) प्रसंग (२) प्रारब्ध (३) प्रज्ञा.

३८२

“कोऽहं” च्या उत्तरावर कर्तव्याचा निर्णय अवलंबून आहे.

३८३

‘हवेची खोली’ म्हणून एखादी स्वतंत्र खोली नाहीं. सर्व च खोल्यांतून हवा पाहिजे तसें, धर्म म्हणून स्वतंत्र विषय नाहीं. सर्व व्यवहारात धर्म पाहिजे.

३८४

रोप जमिनींत लावलें म्हणजे त्याला जमिनींतून पोषण मिळतें, तसे चित्त आत्म्यात रोवलें म्हणजे त्याला आत्म्यातून पोषण मिळतें.

३८५

स्व-धर्म ठरवावा लागत नाहीं. कारण, आपण काहीं आकाशातून अचानक पडलेलो नाहीं आपल्यामागे प्रवाह आहे. स्व-धर्म ह्या प्रवाहानें ठरतो

३८६

‘भुताला भागवताचा आधार’ मिळूं शकतो ह्यांत भागवताचा हि दोष आहे च.

३८७

सर्व जगाचें ऐक्य करण्याची कल्पना शोधून काढणे सोपें आहे. पण स्वतःच्या मनातला क्रोध जिंकणे कठिण आहे.

३८८

'राधा' म्हणजे निष्काम आराधना.

३८९

जिथें पावित्र्य तिथे सौंदर्य. जिथे सौंदर्य तिथे काव्य.

३९०

'धर्माद् अर्थश् च कामश् च' हे टेकीस आलेल्या व्यासांचें वचन आहे. त्याची इच्छा 'धर्मान्मोक्षः' असें म्हणण्याची आहे.

३९१

आत्म-शक्तीच्या इयत्तेवर ईश्वर-शक्तीची इयत्ता अवलबून आहे.

३९२

'पर' म्हणजे 'दुसरा', तसें च 'पर' म्हणजे 'श्रेष्ठ'. दुसऱ्याला आपल्यापेक्षा श्रेष्ठ मानून चालावे ही साधकाची मनोभूमिका.

३९३

आकाशांतून जसे भौतिक वारे वाहत असतात, तसे आध्यात्मिक वारे हि वाहत असतात. ह्या वाऱ्यांचा उगम मुक्त पुरुषापासून असतो. ह्याच्या अव्यक्त स्पर्शानें बद्धांचे मुमुक्षु होतात.

३९४

भक्त प्राण-वृत्तीनें राहतो. म्हणजे मनोवृत्तीने राहत नाही. निर्वासन होऊन राहतो.

३९५

नृसिंहाची पूजा, प्रह्लादाचे अनुकरण.

३९६

ज्या त्यागातून अभिमान निर्माण होतो तो त्याग नव्हे. त्यागातून शांति लाभली पाहिजे. विषारी हवेचा मीं त्याग केला, ह्यात मीं विशेष काय केलें ? माझी शांति मी मिळविली अखेरीस अभिमानाचा त्याग हा च खरा त्याग.

३९७

मुक्कामावर पोचण्याच्या उत्सुकतेमुळे रस्ता विघ्नरूप वाटतो. पण तो च मुक्कामावर पोचण्याचें साधन आहे हे विसरू नये लवकर पोचण्याची तळमळ असेल, तर पावलें वेगानें टाकावीं.

३९८

काम-क्रोधानी हि ज्ञान सिद्ध होते. ह्या ज्ञानाला आपण विनवू शकलो, तर काम-क्रोध शमतील.

३९९

यतत् + विपश्-चित् + मत्पर = स्थित-प्रज्ञ.

४००

मनुष्य किती हि विद्वान् असो, त्याचे ज्ञान जर देहात मावत असेल, तर ह्या ज्ञानाचे माप उघड च आहे.

४०१

उपयोगिता हे धर्माचें शरीर आहे, चित्त-शुद्धि आत्मा.

४०२

ज्ञानदेवाच्या भाषेत गीता-तत्त्व 'नित्य-नूतन' आहे. जे नित्य-नूतन ते च सनातन.

४०३

साधकानें जगाची स्मारक शक्ति वाढण्याचे उपाय शोधावे.

४०४

अर्जुन विचारतो इच्छा नसता हि मनुष्य पाप कशामुळे करतो? भगवान् उत्तर देतात: इच्छा असते म्हणून करतो!

४०५

वेद "एक सत्" म्हणतो, पण त्याबरोबर च "विप्रा बहुधा वदन्ति" असें हि म्हणतो. 'मूढा बहुधा वदन्ति' म्हणण्याची त्याची तयारी नाहीं. ह्यांत वेदाची अविरोध-वृत्ति दिसून येते.

४०६

(१) चित्तशुद्धि (२) देशसेवा (३) विश्वप्रेम (४) देवपूजा

४०७

'तव्य'–भावना हा सात्त्विक मनाचा एक रोग आहे

४०८

"तुम्हाला भोग सुटत नाहींत, तर निदान देवाच्या नावानें भोगा." "तुम्हाला भोग सुटत नाहींत, तर निदान देवाच्या नावाने भोगू नका."

४०९

देह–तमस्, इंद्रिये–रजस्, बुद्धि–सत्त्व, आत्मा-गुणातीत

४१०

सिद्धि दोन प्रकारच्या आहेत —

(१) वैराग्य–साधक आणि (२) ऐश्वर्य--साधक. पहिल्या मोक्षानुकूल आहेत, दुसऱ्या मोक्षविरोधी.

४११

"तुमच्या मतें गीतेत सांगितलेले 'पाप-योनि' कोण?"—"मी."

४१२

अभ्यासांत लांबी रुंदी आणि खोली तिहींची अपेक्षा आहे.

लांबी—दीर्घकाल

रुंदी—नैरंतर्य

खोली—सत्कार

४१३

गुणवताची उपासना सगुण म्हटली, तर गुणाची उपासना निर्गुण म्हटली जाईल.

४१४

लक्ष्मी, शक्ति आणि सरस्वती ह्या (अनुक्रमे वैश्य, क्षत्रिय आणि ब्राह्मण ह्यांच्या) राखीव देवता आहेत. सेवादेवी ही एक च सार्वजनिक देवता आहे.

४१५

सत्त्वोदय—बुद्धि

सत्त्वोत्कर्ष—इंद्रियजय

सत्त्वशुद्धि—भक्ति

४१६

तुझें तें तुझें आणि माझें तें हि तुझें,—असा अद्वैताचा विनियोग आहे. कारण, माझें अद्वैत-ज्ञान मला लागू आहे, दुसऱ्याला नाहीं.

४१७

आळस, अज्ञान आणि अश्रद्धा हे तीन ‘महारिपु’ आहेत.

४१८

ससाराच्या खोलीला भिऊ नको. तुला पोहून पृष्ठ-भागावरून च जायचें आहे ना ? कीं आत बुडायचें आहे ?

४१९

‘सर्व-भूत-हित’ ही निर्गुण उपासना आहे. ती नीतीची बाह्य कसोटी समजून तिची ‘जन-हितवादा’शीं तुलना करणें योग्य नाहीं.

४२०

लोकसेवा नम्र कर्तव्य आहे लोकसग्रह थोर अधिकार आहे.

४२१

‘द्रष्टव्य. श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः’ अशी श्रुति आहे. ह्यापैकीं श्रोतव्यादि तीन द्रष्टव्याचीं साधनें मानण्यात येतात. पण द्रष्टव्यादि तीन निदिध्यासितव्याचीं साधनें मानणें हि शक्य आहे.

४२२

देहसबद्धता — बद्ध
देहव्यतिरिक्तता — बुद्ध
देहातीतता — शुद्ध
देहरहितता — मुक्त

४२३

व्यापक विश्व-सस्था, मर्यादित मानव्य-संस्था व विशिष्ट शरीर सस्था ह्या मनुष्याच्या तीन सहज संस्था आहेत. ह्यानीं च बधन आहे. ह्यातून च मोक्षाचा रस्ता आहे.

४२४

साकेतिक विज्ञान
नैतिक विज्ञान
भौतिक विज्ञान
आध्यात्मिक विज्ञान.

४२५

पाणिनीचा उत्तम पुरुष तो च भगवताचा पुरुषोत्तम.

४२६

सूर्याची च नव्हे तर जलसूर्याची हि प्रभा पडते. ज्ञानाची च नव्हे तर ज्ञानाच्या आभासाची हि कदर होते.

४२७

हिमालय सुंदर आहे. पण त्याच्या सुदरतेविषयींची माझी कल्पना त्याहून सुंदर आहे ह्याचें कारण काय? आत्म्याच्या सुदरतेची बरोबरी जड वस्तूची सुदरता कशी करणार?

४२८

परोपकाराचीं कर्मे चित्तशुद्धि करतील, पण निरहकार वृत्तीनें केलीं असतील तर.

४२९

'श्रुतिवचनाला अर्थाचा बोजा होत नाहीं' असें आचार्य म्हणतात. ह्याचा अर्थ श्रुतिवचन वाटेल तितका बोजा सहन करते असा आहे, वाटेल तसला बोजा सहन करतें असा नाहीं.

४३०

ज्ञानाची ज्ञानगम्यता म्हणजे पूर्व जन्माची सिद्धि, म्हणजे च आत्म्याची अमरता.

४३१

आसक्ताच्या आसक्तीने आत्म्याच्या अमरत्वाची सिद्धि होणार नाहीं. कारण, आसक्ति भ्रमजन्य आहे. विरक्ताची अनासक्ति हा आत्म्याच्या अमरत्वाचा वास्तविक पुरावा आहे

४३२

आजचें लोकमत = दीनाचें मत,
ज्याला कोणी पुमत नाहीं,
+ दुर्जनाचे मत,
जें कोणाला पुसत नाहीं,
+ विद्वानाचें मत,
ज्यात मेळ नाहीं.

४३३

कधीं सत्यार्थ हिंसा, आणि कधीं अहिंसार्थ असत्य मिळून दोन्ही उडवण्याचा तार्किकाचा धंदा आहे.

४३४

अहिंसादि असून आत्मज्ञानाचा उदय झालेला नाहीं, असे मी मानू शकतों. पण आत्मज्ञानोदय झालेला असून अहिंसादि नाहींत, असे मानणे मला जड जातें.

४३५

गृहाभिमान गेला म्हणजे गृहबंधन सुटतें त्यासाठीं घर सोडावें किंवा पडावें लागत नाहीं तसें च देहाभिमान गेला म्हणजे देहबंधन सुटलें पाहिजे. त्यासाठीं देह सोडण्याची किंवा पडण्याची अवश्यकता असण्याचें कारण नाहीं.

४३६

आईवरून स्त्रीवर, स्त्रीवरून पुत्रावर ही प्रेमाची अधोगति. आईवरून संतावर, संतावरून देवावर ही प्रेमाची ऊर्ध्वगति.

४३७

"आम्नायस्य क्रियार्थत्वात् आनर्थक्य अतदर्थानाम्" हें जैमिनीचें सूत्र 'क्रियार्थत्वात्' ऐवजीं 'दर्शनार्थत्वात्' असा फरक करून मी वाचतो.

४३८

ईश्वराशीं साधर्म्य पावलेल्या पुरुषावर विश्वांतील कोणत्या हि चळवळीच्या सर्ग-प्रलयाचा परिणाम होणे शक्य नाहीं.

४३९

भिन्न देवता म्हणजे एका च देवाच्या गुण-मूर्ति आहेत.

४४०

शोधन—त्रयी

१ विचार-शोधन

२ वृत्ति-शोधन

३ वर्तन-शोधन

४४१

अ-प्रतिकार म्हटला म्हणजे त्यात अ-पुरस्कार गृहीत समजला पाहिजे.

४४२

साधुसताना हि आम्ही ‘भोग्य’ करूं पाहतों. पण ते आमच्या पचनीं पडण्यासारखे नसतात, ह्याला आमचा नाइलाज असतो.

४४३

मागचा ‘पशु’ रुचत नाहीं, पुढचा ‘मनुष्य’ अजून बनला नाहीं, ह्या मधल्या भयानक साधकावस्थेला मी साधनेचा नृ-सिंहावतार म्हणतो.

४४४

मला धुके दुसरीकडे दिसते. दुसऱ्याला धुके माझ्या जवळ दिसतें. वास्तविक धुके सगळीकडे च आहे. मला दुसऱ्याच्या स्थितींत समाधान दिसतें. दुसऱ्याला माझ्या स्थितींत समाधान दिसतें. वास्तविक समाधान सर्वत्र आहे. पण ओळख पटली पाहिजे.

४४५

जीवनात भीति राखली म्हणजे मरण निर्भय होईल.

४४६

लहानपणीं गणपति बुडविण्याच्या वेळीं चित्ताला फार आघात होई. एवढ्या प्रेमाने ज्याची स्थापना केली, इतके दिवस पूजा केली, त्याला बुडविण्याची कल्पना सहन होत नसे. पण मूर्तिपूजेची मर्यादा शिकविण्यासाठीं हिंदुधर्मानें हा पदार्थपाठ निर्माण केला आहे.

४४७

'भीष्म' आणि 'बिभीषण' दोहींचा अर्थ 'भयकर' कोणाला भीष्म स्वपक्षनिष्ठ आणि बिभीषण देशद्रोही दिसतो, तर कोणाला भीष्म सत्यद्रोही आणि बिभीषण सत्यनिष्ठ दिसतो. पण मनुष्याची योग्यता मापण्याची पुराणकारांची कांहीं निराळी च कसोटी दिसते. कारण, ते दोघाना हि 'परम भागवत' म्हणतात.

४४८

नवा राजा म्हटला कीं नवा शिक्का आला च तसें नवीन दर्शन आलें कीं त्याबरोबर भापा हि नवीन बनते.

४४९

'मी ज्ञानी' हा हि अहंकार, आणि 'मी मूढ' हा हि अहकार.

४५०

शास्त्रार्थाची लावालाव हे कलियुगातले मोठे पाप आहे.

४५१

मनुष्य आधीं दरिद्री होतो द्रव्य मागून जातें. प्राप्ति आधीं, फळ पुढे. 'मरणाआधीं च राहिलो मरूनि' ह्याचा अर्थ हा च.

४५२

भक्त प्रवाह-पतित साधनें वापरून मोकळा होतो योगी साधनेला अनुकूल प्रवाह निर्माण करतो दोघाना दोन्ही गोष्टी यथासभव कराव्या लागतात.

४५३

कर्मयोगी—जळलेली आकृति-मात्र गोवरी.

सन्यासी—जळून राख झालेली निराकार गोवरी.

४५४

कर्मयोगी—पांढऱ्या दुधाची काळी गाय.

सन्यासी—पाढऱ्या दुधाची पाढरी गाय.

४५५

कर्मयोगी—सूर्याप्रमाणे अखड कर्म करतो.

सन्यासी—सूर्याप्रमाणे अखड अकर्ता असतो.

४५६

जनता जड असली तरी थर्मामिटरप्रमाणें अचूक योग्यता-मापक आहे

४५७

पूर्वी आश्रमात एक म्हैस होती. ती आपल्या पारडाला तसे च दुसऱ्या म्हशीच्या पारडाला किंवा गाईच्या वासराला हि दूध पाजीत असे. कोणी तिला जड म्हणत. मी तिच्या पासून समत्व-बुद्धि शिकलो.

४५८

उत्तरोत्तर अनुद्भूत चैतन्य श्रेष्ठतर मानण्यास हि कारण आहे.

४५९

ऋषींच्या समत्वबुद्धीचा परिणाम संस्कृतभाषेच्या उच्चारण-पद्धतींत हि दिसून येतो.

४६०

ज्ञानानतर होणारे कर्म केवळ आभासरूप आहे. छायेनें ज्याप्रमाणें मनुष्याचा एकान्त बिघडत नाहीं त्याप्रमाणें त्या छायारूप कर्माने ज्ञानाचा एकान्त बिघडू नये.

४६१

प्रजापतीचा मत्र 'द'.

देवाचा अर्थ—दमन करा

असुराचा अर्थ—दया करा

मनुष्याचा अर्थ—दान करा

माझा अर्थ —दगड बना

"स एषोऽश्माखण. छा (३) २८

४६२

वेदमत्रापेक्षा हि नामाचा महिमा अधिक आहे. नामांत अमर्याद शक्ति भरता येते.

४६३

वैराग्य एका पारड्यांत आणि बाकीची सर्व सात्त्विकता दुसऱ्या पारड्यात घालून तोल घेतला तेव्हा वैराग्य जड भरलें

४६४

वाल्मीकीची प्रतिभा, व्यासाची प्रज्ञा आणि शुकाचें प्रेम ह्याची बेरीज केली तर ती ईश्वरत्व मोजण्याचा एक लहानसा एक होऊ शकेल.

४६५

स्वप्नातील सुखदुःखाच्या अनुभवावरून मरणानंतर जीवाला सूक्ष्म देहात भोगाव्या लागणाऱ्या सुखदुःखाची कल्पना येऊ शकते.

१ मरण — निद्रा
२ सूक्ष्मदेह — स्वप्न
३ स्वर्ग — स्वप्नगत सुखे
४ नरक — स्वप्नगत दुःखें
५ ब्रह्मलोक — सुषुप्त
६ पुनर्जन्म — पुनर्जागरित.

४६६

रामावतारीं देवानें उदंड सेवा घेतली कृष्णावतारीं उदंड सेवा केली.

४६७

एखाद्याला कोण्या हि उपायानें पृथ्वीच्या आकर्षणा-बाहेर पोंचविणे शक्य झाले तर तो आपोआप मंगळावर जाईल, अशी एक वैज्ञानिक अपेक्षा आहे. कोण्या हि उपायानें वासनेच्या आकर्षणाबाहेर जाता आलें तर आपोआप परम मंगल गांठता येईल, यात शंका नाहीं.

४६८

वर्तुळाकार फिरणाराला मुक्कामाची जागा कोठे च नाहीं, अथवा बसल्या जागी आहे.

४६९

रूपकादिकाची शक्यता हे अद्वैताचे नैसर्गिक प्रमाण आहे उपासनेचा आधार हि ह्या च अद्वैतप्रामाण्यावर आहे.

४७०

प्रवृत्तीचा विरोध करणारी निवृत्ति ही खरी निवृत्ति नव्हे. ती प्रवृत्तीची च तऱ्हा आहे प्रवृत्तीला जी सहज पोटात घालू शकते ती निवृत्ति.

४७१

वैराग्य म्हणजे मारलेला रजोगुण. परमार्थांतली सर्व उसळी वैराग्यामुळें आहे

४७२

पापाविरुद्ध चार शक्ति आपापल्या परी लढत आहेत—
(१) पुण्य, (२) भोग, (३) प्रायश्चित्त (४) आत्मज्ञान.

४७३

सत्याविरुद्ध जें काहीं उभें राहील तें सहज च लटके पडेल.

४७४

धनुर्धारी रामाने यज्ञात विघ्न करणाऱ्या राक्षसांपासून ऋषींचें रक्षण केलें, हें केवळ ऐतिहासिक च नव्हे पण त्रैकालिक सत्य आहे

४७५

अन्वेषणेचे नियमन हा यज्ञाचा उद्देश आहे.

४७६

बुद्धि हें आत्मदर्शनाचें महाद्वार आहे. बुद्धि उघडली कीं आत आत्मा उभा च आहे

४७७

देवतेचें स्वरूप आध्यात्मिक असते उदाहरणार्थ: सूर्यदेवता—प्रेरणा, आपोदेवता—श्रद्धा, गृहदेवता—स्थिरता, वनदेवता—स्वतंत्रता. ते न समजून पण श्रद्धापूर्वक पूजा करणाराला सामान्य चित्तशुद्धि लाभेल, पण विशिष्ट चित्तशुद्धि देवतेच्या स्वरूपज्ञानावर आहे.

४७८

सिद्धि ही शुद्धीची कसोटी आहे. ह्या कसोटींत अनेक जन्म जाण्याचा हि संभव आहे. ताप फणफणतो आहे असें रोग्याला वाटलें, तरी नेमका ताप किती आहे हे थर्मामिटरनें च कळते.

४७९

वस्तूचा आकार तिच्या शेवटच्या कडावरून ठरतो. गर्भवास आणि मरण ह्याची दु:खमयता मानली, म्हणजे ससाराची दु:खमयता सहज च ठरली. कारण, गर्भवास आणि मरण ह्या च ससाराच्या दोन कडा आहेत.

४८०

सत्याग्रहाचा ज्याप्रमाणे आज आपण सामुदायिक प्रयोग करू पहात आहोत, त्याप्रमाणें संन्यासतत्त्वाचा सामुदायिक प्रयोग करण्याचा सन्यासाश्रमाचा हेतु आहे. व्यक्तिगत प्रयोगातली विशिष्ट उज्ज्वलता सामुदायिक प्रयोगात उतरत नसली, तरी त्यात एक प्रकारची व्यापक उज्ज्वलता असते.

४८१

मागील गुणदोषाच्या स्मरणानें आत्म्याचा अपमान होऊ नये, म्हणून पूर्वजन्माच्या विस्मरणाची योजना देवानें केली आहे.

४८२

संसाराला समुद्राची उपमा देण्यात येते. समुद्रात पडलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें पुढच्या क्षणाची वाट न पाहतां चालू क्षणात च पोहलें पाहिजे, त्याप्रमाणें संसारातून सुटण्याचा प्रयत्न हि चालू क्षणात च केला पाहिजे.

४८३

कर्म म्हणजे प्रत्यक्ष सेवा.

भक्ति म्हणजे सेवा-भाव.

४८४

मुरलीचा ध्वनि मला कृष्णस्मरणानें समाधिस्थ करूं शकतो. पण—

(१) अधारी रात्र असावी,

(२) कोण वाजवीत आहे ते माहीत नसावे,

(३) ध्वनि दुरून येत असावा.

ह्याचे कारण अव्यक्ताचे सामर्थ्य.

४८५

मनात वासना उगवली तरी तन्मूलक बाह्य कर्म निश्चयाने टाळलें तर वासना दृढावणार नाहीं.

४८६

वैराग्याची विवेकयुक्तता ही च वैराग्याची दृढता.

४८७

समुद्राचा देखावा आनंदमय आहे. पण तो तीरावरून पाहणाराला, आत बुडणाराला नव्हे.

४८८

डोंगरावर जितकें उंच चढावें तितका देखावा अधिक भव्य दिसतो. आचरणाच्या उंचीवर विचाराची भव्यता अवलंबून आहे.

४८९

शाश्वत स्वरूपाची सेवा कधीं च बोटानें दाखवितां येण्यासारखी नसते

अक्षरम् अनिर्देश्यम् ।

४९०

निर्गुणामुळें सगुणाला योग्य मर्यादा राहते ती न राहिली तर सगुण सदोष बनेल.

४९१

विश्व म्हणजे निजलेला विष्णु च आहे. त्याला प्रेमादरानें विनवून च जागविलें पाहिजे.

४९२

जो अर्थ शब्दाला आणि तत्त्वाला धरून तो खरा. असा अर्थ 'शाब्दे परे च निष्णात' च जाणूं शकतो.

४९३

योद्धे आणि मुत्सद्दी मिळून युद्ध यशस्वी होतें. सत्याग्रहाच्या युद्धांतील अहिंसा योद्धा आहे आणि सत्य मुत्सद्दी.

४९४

पृथ्वीला शेषाचा आधार म्हणजे पृथ्वीला पृथ्वीतराचा आधार. सापाप्रमाणें भासणाऱ्या परार्थाचा माझ्या स्वार्थाला आधार आहे, हें मीं ओळखलें पाहिजे.

४९५

राजस चंचल असतें हा राजसाचा मोठा उपकार होय ते स्थिर असतें तर अनार्थाला पार नव्हता.

४९६

सत्त्वगुणाशिवाय एकाग्रता नाहीं. तमस् शून्याग्र आणि रजस् अनेकाग्र आहे.

४९७

रजस्-तमस् नि शेष नाहींशीं झालीं म्हणजे सत्त्वगुण न मरता मरतो.

४९८

कातणें सुंदर चाललें असलें म्हणजे चरख्यातून 'ॐ' 'ॐ' असा ध्वनि अनाहत निघत राहतो काहीं बिघडलें असलें तर 'नेति' 'नेति' असा पुकार होत राहतो.

४९९

गायत्र्यादि मंत्राचा 'उपांशु'–जप विहित आहे. म्हणजे हे मंत्र हळू आवाजात, मनातल्या मनात आपल्याशीं च म्हटल्यासारखे जपावयाचे आहेत अर्धोन्मीलित दृष्टीचा जो हेतु, तो च ह्या 'उपांशु'-जपाचा हेतु.

५००

सर्वोच्च तत्त्वे सर्वव्यापक आणि सर्वोपयुक्त असल्या-मुळें सर्वसुलभ असतात.

५०१

कृष्ण व्यभिचारी समजून तू त्याची निंदा करतोस, कृष्ण प्रेम-मूर्ति म्हणून मी त्याची पूजा करतो. व्यभिचाराची निंदा आणि प्रेमाची पूजा ह्यात विरोध नाहीं व्यक्तिशः कृष्ण कसा होता हा प्रश्न केवळ ऐतिहासिक आहे. एकवाक्यतेची ही युक्ति सर्वत्र अविरोधसाधक व्हावी.

५०२

अहकाराच्या डोगरातून उगम न पावता आणि फळाच्या समुद्रात प्रवेश न करता अनासक्ताचीं कर्मे मृगजळाच्या लहरींप्रमाणें अत्यत उत्साहानें चाललेलीं असतात.

५०३

देवाच्या इच्छेनें च कार्य होतें, पण आमची कृति देवाच्या इच्छेला वाहनासारखी आहे.

५०४

आकाश अडथळा करीत नाहीं म्हणून कोणी आकाश अभावरूप मानतात. पण आकाश अडथळा करीत नसले तरी अवकाश देते म्हणून ते भावरूप च मानले पाहिजे. तें अडथळा करीत नाहीं ह्याचें कारण त्याचे अभावरूपत्व नसून अपरिच्छिन्नत्व आहे.

५०५

देव दुहेरी अवतार धारण करून धर्माची, तत्त्वाची, स्थापना करतो : (१) कालावतार आणि (२) पुरुषावतार. कालावतार अधर्माची अशक्यता दाखवतो, पुरुषावतार अधर्माची अनिष्टता

५०६

वस्तूत आकार असतो, आकारांत वस्तु नसते आणि वस्तूत हि आकार (वस्तूहून वेगळा) नसतो, हा च वास्तविक चमत्कार होय

५०७

बुद्धि आणि भावना ह्यांचा समन्वय म्हणजे च विवेक.

५०८

क्षेत्रांतील क्षेत्रज्ञ जो पाहू शकत नाहीं तो क्षेत्र तरी काय पाहतो? दिव्यातील ज्योत ज्याने पाहिली नाहीं त्यानें दिवा काय पाहिला?

५०९

'सतत श्वासोच्छ्वास कर' हा विधि आणि 'डोक्यानें चालू नको' हा निषेध ज्या कारणासाठीं मला लागू नाहींत त्या च कारणासाठीं ज्ञानी पुरुषाला नैतिक विधिनिषेध लागू नाहींत नैतिक विधये ज्ञानी पुरुषापाशीं सहज च असतात, नैतिक निषेध्यें सहज च नसतात.

५१०

ध्यान म्हणजे विश्वाचा आपल्यावर बसणारा वार चुकविण्याची तात्कालिक युक्ति आहे. ज्ञानाने आपण विश्वावर वार करून त्याला कायमचे घायाळ करतो. विश्व नाहींसे करणे हे ध्यानाचे रूप विश्व च ब्रह्मरूप पाहणें हे ज्ञानाचें रूप.

५११

कर्तव्यत्रयी—

१ सत्यनिष्ठा

२ धर्माचरणाचा प्रयत्न

३ हरिस्मरणरूप स्वाध्याय.

५१२

सतापेक्षा हि सत्य श्रेष्ठ आहे. सत्याच्या अंशमात्रांतून सत निर्माण झाले आहेत.

५१३

श्वास बाहेर टाकताना इजनातून बाहेर पडणाऱ्या वाफेच्या आवाजाप्रमाणे 'सो' असा आवाज होतो, आणि श्वास आत घेताना घुमटातील आवाजाप्रमाणे 'हम्' असा आवाज होतो एवढ्या ध्वनिसाम्यावरून च श्वसनक्रियेवर 'सोऽहम्' ची उभारणी नाहीं ही बाह्य खूण आहे. श्वसनक्रियेतील आध्यात्मिक हेतु ब्रह्माडातील व्यापक भावनेने पिंडातील सकुचित भावना धुऊन काढणे हा आहे हा हेतु 'सोऽहम्' ने सूचित होतो, म्हणून श्वसनक्रियेवर 'सोऽहम्' ची उभारणी आहे.

५१४

क्रोधी पुरुषाच्या मौनानें त्याचें मौन सिद्ध होत नाहीं, क्रोध सिद्ध होतो क्रोधी पुरुषाच्या वक्तृत्वाने त्याचे वक्तृत्व सिद्ध होत नाहीं, क्रोध सिद्ध होतो

ज्ञानी पुरुषाच्या कर्माने त्याचे कर्म सिद्ध होत नाहीं, ज्ञान सिद्ध होतें. ज्ञानी पुरुषाच्या अकर्मानें त्याचे अकर्म सिद्ध होत नाहीं, ज्ञान सिद्ध होतें.

५१५

ज्ञानी जीं कर्मे करतो तीं तर करतो च, पण जीं करीत नाहीं तीं हि करतो, म्हणून तो पूर्ण कर्मयोगी.

ज्ञानी जीं कर्मे करीत नाहीं, तीं तर करीत नाहीं च, पण जीं करतो तीं हि करीत नाहीं, म्हणून तो पूर्ण कर्मसन्यासी.

५१६

बुद्धिस्थ विवेक इंद्रियात ओतण्याचा प्रयत्न म्हणजे तितिक्षा.

५१७

अनेक क्षेत्रातून एक च नदी वाहते. तो च दृष्टान्त आत्म्याला

५१८

शास्त्र ज्ञापक आहे, कारक नाहीं ही शास्त्राची मर्यादा आहे, आणि हा च शास्त्राचा महिमा.

५१९

भक्ताच्या ठिकाणीं योग सहज असतो. कारण, हरिमयतेत निर्विषयता येऊन च जाते.

५२०

वस्तूतून तिचे सर्व गुण–दृष्ट, अदृष्ट–वजा केले तर शिल्लक काय राहते ?

एक म्हणतो, ‘ शून्य ’.

दुसरा म्हणतो, ‘ विशेष ’.

तिसरा म्हणतो, ‘ अज्ञेय ’

वेद म्हणतो, ‘ आत्मतत्त्व ’.

५२१

योगाचे सार—

१ यम, २ नियम, ३ संयम.

५२२

व्यक्तीचा 'अहं' समष्टीच्या 'अहं' मध्ये लीन झाल्यानंतर च ईश्वराला अर्पण होऊं शकतो आधीं शुद्धि मग समर्पण.

५२३

ज्ञान अगदीं जुनें उत्तम.

उपासना अगदीं शेवटची उत्तम.

५२४

आहार्य अन्नाची वृत्ति-भेदानें त्रिविध परिणति होते, लैंगिक, प्राणिक आणि आत्मिक.

५२५

अर्थ, समाज इ० सामाजिक शास्त्रें नियामक नाहींत, नियमित आहेत. मी त्यांना जो नियम लावीन तो स्वीकारणें त्यांना भाग आहे.

५२६

पाणी आपण होऊन मला बुडवूं शकत नाहीं मी पाण्यांत पडेन तर च बुडवूं शकतें. तें हि मी पोहत असेंपर्यंत बुडवूं शकत नाहीं, माझें पोहणें थकल्यानंतर बुडवूं शकतें. तें हि माझी 'देहबुद्धि' असेल तर बुडवूं शकतें, एरवीं बुडवूं शकत नाहीं. ह्याचें नांव 'आत्म-स्वातंत्र्य.'

५२७

सत कोण ? माझ्यातला विशिष्ट दोष मला ज्याच्यात दिसत नाहीं, किंवा अल्प दिसतो, तो मला सत. ह्याहून अधिक विचार करण्याचे मला कारण नाहीं

५२८

'सत् ब्रह्म' सिद्ध होते
'चित् ब्रह्म' लक्षात येतें.
'आनद ब्रह्म' डोळ्या भरते
१ विश्व, २ जीव, ३ सत.

५२९

पूर्वाचाराचे अनुकरण अपेक्षित नाहीं, अनुमनन अपेक्षित आहे.

५३०

अकर्तृत्वाचे प्रकार—
१ कर्मत्व, २ निमित्तत्व, ३ साक्षित्व.

५३१

देहात मोक्षाची शक्यता आहे, पण सभव नाहीं.

५३२

कर्मयोगाचे यत्र सतत राखावे. घर्षणाच्या भीतीनें ढील करू नये. घर्षण टाळण्यासाठीं भक्तीचें तेल द्यावें.

५३३

अधर्म, परधर्म, उपधर्म ह्या तीन आडवाटा टाळून साधकानें स्वधर्म आचरावा

५३४

कर्मयोगात कालनियमन, कर्मनियमन आणि कल्पना-नियमन अवश्यक आहे.

५३५

हेतु, परिणाम आणि स्वरूप हीं तिन्ही पाहून कर्माची योग्यता ठरवावयाची.

५३६

देहाधतेमध्ये दोन दोष आहेत (१) बहिर्मुखता आणि (२) सकुचितता बहिर्मुखतेमुळे आतला देव अंतरतो. सकुचिततेमुळे दुनिया दूर होते

५३७

साधुत्वाची द्विरूप प्रवृत्ति असते कधीं सग्राहक, कधीं सशोधक. संग्राहक साधुत्व पूर्वानुभवाचा समन्वय करते. सशोधक साधुत्व नवीन आविष्कार करतें.

५३८

‘ शिक्षण म्हणजे सत्सगति. ’ ह्याहून निराळी शिक्षणाची व्याख्या मी करू शकत नाहीं.

५३९

आश्रमांत एक कुत्रा होता. तो प्रार्थनेची घटा झाल्याबरोबर नियमाने प्रार्थनेला येत असे त्यानें आम्हाला नियमधर्म शिकवला. तो मेला त्या दिवशीं आश्रमातील मडळींनीं एक वेळ उपवास केला.

५४०

माझ्या धर्मात उपासना ऐच्छिक आहे आणि म्हणून अनिवार्य आहे.

५४१

ममत्व-बुद्धीचें मर्मस्थान हें कीं तिच्या योगाने मनुष्य आपली सार्वभौम सत्ता गमावून बसतो.

५४२

उपासना म्हणजे देवाच्या जवळ बसणें, म्हणजे च बसल्या जागीं देवाला आणणे.

५४३

आधीं जग कसे आहे ते पहावयाचें, मग त्यावरून सिद्धान्त ठरवावयाचा—ही वैज्ञानिक विचार-पद्धति. समाधींत सिद्धान्त स्फुरला, आता जग तसें असावयाला बाधलेले च आहे—ही आध्यात्मिक निर्विचार पद्धति.

५४४

पुरुष दिव्यासारखा आहे. वीर्य तेलाच्या जागीं आहे. प्राण वात, आणि प्रज्ञा ज्योत.

‘दिव्या दिव्या ! नमस्कार’

५४५

साम्ये अनेक आहेत. पण त्या सर्वांत ब्रह्म-साम्य अन्तिम आणि श्रेष्ठ आहे.

५४६

प्रह्लादाने नवविधा भक्ती सांगितली आहे पण भक्ति नवविधा म्हणजे नऊ च प्रकारची असली पाहिजे, असा कायदा नाहीं. नवविधा म्हणजे अनेक प्रकारची नवीन नवीन उमाळ्यांनी प्रगट होणारी, असा भाव मी घेतो

५४७

‘पश्यति’ शिवाय ज्याला विश्वास पटत नाहीं तो ‘पशु’. ‘मनुते’ वर ज्याचे काम भागते तो ‘मनुष्य’

५४८

अनुभविकाचा अनुभव—तो प्रामाणिक असेल तर—प्रमाण मानला पाहिजे, पण म्हणून अनुभविकाचा निष्कर्ष प्रमाण मानला पाहिजे, असे होत नाहीं.

५४९

खरे साधन एक च – तळमळ

खरी सिद्धि एक च – शांति

५५०

साधक अग्नीसारखा असावा–विवेक ज्याचा प्रकाश, वैराग्य उष्णता.

५५१

परा — नेति

पश्यन्ती — ॐ

मध्यमा — राम

वैखरी — सत्य

५५२

मनात साचलेली अडगळ साफ करून मन मोकळें करणें हें अपरिग्रहाचें कार्य आहे.

५५३

ब्रह्म केवळ ‘नेति’ नाहीं. ब्रह्म ‘नेति नेति’ आहे. जे सगुण हि नाहीं आणि निर्गुण हि नाहीं ते खरे निर्गुण.

५५४

वेदामध्ये ‘सहते’ ह्या धातूचे दोन अर्थ आहेत: (१) सहन करणे, आणि (२) जिंकणे. जो सहन करतो तो च जिंकतो.

५५५

नम्रता म्हणजे लवचिकपणा. लवचिकपणांत तणावाची शक्ति आहे, जिंकण्याची कला आहे आणि शौर्याची पराकाष्ठा आहे.

५५६

ज्ञानाच्या चार भूमिका—

१ ज्ञान

२ व्यवसाय

३ समाधि

४ प्रज्ञा.

५५७

यज्ञाने मुख्यत. दैविक (म्ह० प्राकृतिक) शक्तींचा तोल राहतो. दानाने सामाजिक, आणि तपाने मानसिक शक्तींचा तोल राहतो

५५८

देवी उषे ! तूं सात्त्विकता-मूर्ति आहेस. रजोगुणी दिवस आणि तमोगुणी रात्र ह्यांच्या कैचीत सापडलेल्या मनाची सुटका तुझ्याशिवाय कोण करणार ?

५५९

यशानें नम्रता आणि अयशानें उत्साह हा यश आणि अयश ह्यांचा कर्मयोगांतील विनियोग आहे.

५६०

'प्रिय ब्रह्म'–ईश्वर प्रेममय आहे–असे श्रुतीचें वचन आहे. भक्तिमार्गाचा बीजमंत्र हा च.

५६१

'सातत्य' हे कर्मयोगाचे कवच आहे गीतेच्या आठव्या अध्यायाचे सातत्य हें सार आहे, म्हणून मी त्या अध्यायाला 'सातत्य-योग' असें नाव देतो.

५६२

वेदामध्ये ईश्वराला 'सुरूप-कृत्नु' म्हटले आहे. सुंदर सृष्टि निर्मिणारा स्वतः किती सुंदर असेल !

५६३

अल्प श्रद्धेच्या माणसाला लोक परमार्थ पचनीं पडू देत नाहींत, हा लोकाचा उपकार आहे.

५६४

साधकाच्या साधनेत अशी एक अवस्था येते कीं ज्या वेळीं त्याला पुढे विचार करण्याला कांहीं तरी आलंबन लागतें. त्याशिवाय धीर खचतो, निश्चय डळमळू लागतो, बुद्धि साशंक होते. ही कसोटीची वेळ आहे.

५६५

सर्व दानामध्ये अभय-दान श्रेष्ठ आहे आणि ते देण्याचे सामर्थ्य मुक्ताशिवाय म्हणजे च ईश्वराशिवाय कोणाला नाहीं.

५६६

स्वप्नजय दोन प्रकारचा—

१ सुस्वप्नता, २ निःस्वप्नता

सुषुप्तजय म्हणजे सुषुप्तींत विचाराचा नित्य-विकास.

५६७

उन्मनींत सृष्टीची ओळख नाहीं सहजस्थितींत ओळख असून ओळख नाहीं उन्मनी कालपरिच्छिन्न आहे सहजस्थिति नित्य आहे

५६८

निंदास्तुतींची वजाबाकी करणारा मनुष्य आपोआप मोकळा होतो

५६९

अपरिग्रहाचा खरा अर्थ देहभाव नाहींसा होणें हा आहे कारण, देह च मुख्य परिग्रह आहे.

५७०

देहधारी पुरुषानें आपली सर्व प्रेमशक्ति एकवटून केलेल्या संपूर्ण सेवेचें अंतिम फलित 'अ-हिंसा' ह्या निषेधक शब्दानें व्यक्त होतें.

५७१

जर ईश्वराला दुसऱ्या एखाद्या वस्तूची उपमा देतां आली तर ती च वस्तु ईश्वर का होणार नाहीं ? कारागिराला चित्राची उपमा कशी देता येईल.

५७२

कोंबड्याचा आवाज (१) तीव्र, (२) मृदु, (३) क्रमिक आणि (४) अनुकंपित असतो. जागविणाराची वृत्ति अशी च हवी.

५७३

स्वप्नात विचार सुचला—मनुष्याने नेहमीं दुग्धाहार करावा, म्हणजे 'सर्व आहाराचे दोहन घ्यावें' अर्थ अजून पुरता उलगडत नाहीं. पण विचार नमूद करून ठेवतो.

५७४

आपण 'बिघडून' दुसऱ्याना बिघडवणें हा संताचा स्वभाव च आहे. त्यातून तरुणाना बिघडवणे हे तर त्याचे अवतार-कार्य आहे.

५७५

भुक्ति आणि मुक्ति एकाच काठीची दोन टोकें आहेत.

५७६

सर्व च प्रश्न सोडवून सुटणारे नसतात. काही प्रश्न सोडून दिले की सुटतात.

५७७

जोपर्यंत डोळ्यात अद्वैत बिंबलें नाही तोपर्यंत सौंदर्याच्या कसोटीवर विश्वसून चालणार नाहीं.

५७८

आरुरुक्षु जीवनांत— (१) उद्योग, (२) प्रयोग.

आरूढ जीवनात— (१) योग.

५७९

पहिली ठिणगी पडण्याला युगें गेलीं, पण आतां राख होण्याला त्रैराशिक मांडण्याची जरूर नाहीं.

५८०

चित्ताची एकाग्रता ही योगाची समाप्ति नव्हे. तिथून योगाची सुरवात आहे.

५८१

देव—एकवचन

देव आणि भक्त—द्विवचन

देव, भक्त आणि सेवा—बहुवचन

५८२

ज्याला डोळ्यासमोर देव दिसतो तो ज्ञानी झाला. पण पाठीशीं देव उभा आहे एवढी श्रद्धा स्थिर झाली तरी साधकाला पुरें आहे.

५८३

अग्नीसाठीं जंगल तोडून रस्ता तयार करावा लागत नाहीं. तो च आपला रस्ता पाहून घेतो. भक्ताला परिस्थिति कधीं च प्रतिकूल नसते.

५८४

आर्त भक्त देवाचे हृदय आहे, जिज्ञासु देवाची बुद्धि, अर्थार्थी देवाचा हात आणि ज्ञानी देवाचा आत्मा.

५८५

तत्त्वज्ञान धर्माला बीजस्थानी आहे. बीजांतला अल्प फरक फळांत मोठा होऊन बसतो, म्हणून तत्त्वज्ञानात सूक्ष्मता हवी.

५८६

तळमळ शांत होण्याला देवाचा प्रत्यक्ष स्पर्श पाहिजे, थोडें अंतर हि सहन होणार नाहीं अगदीं ओठाजवळ धरलेल्या पाण्याच्या पेल्यानें हि तृषा शमेल काय ?

५८७

प्रार्थनेपेक्षां हि प्रार्थनेतून उत्पन्न होणारा वेग अधिक महत्त्वाचा आहे. ह्या वेगावरून प्रार्थनेची खोली मापावयाची.

५८८

वैराग्यांत हि साभिलाष वैराग्य आणि निरभिलाष वैराग्य असे दोन प्रकार आहेत. पहिल्याची उभारणी 'अनित्य'-भावनेवर आहे, दुसऱ्याची 'असुख'-भावनेवर.

५८९

तपाचे प्रकार—

१ अज्ञानमूलक
२ विषयमूलक
३ दंभमूलक
४ दुराग्रहमूलक
५ वैराग्यमूलक
६ प्रेममूलक
७ ज्ञानमूलक.

५९०

प्रतीक्षा आणि उपेक्षा पूरक भावना आहेत. साधकाला यथासमय दोन्ही पाहिजेत

५९१

व्यक्तिगत प्रार्थनेनें मी देवाची मदत मिळवतों, सामुदायिक प्रार्थनेने सताची.

५९२

अंध श्रद्धा म्हणजे काय ?—'तर्क तो देव जाणावा' ह्या श्रद्धेचे नाव अंध श्रद्धा.

५९३

अर्थापेक्षां शब्द खोल आहे. शब्दापेक्षां भाव खोल. भावापेक्षा अभाव.

५९४

माझ्या सूत्रोपासनेची चतुःसूत्री--

१ सूत्र म्हणजे सूत.

२ सूत्र म्हणजे नियम.

३ सूत्र म्हणजे प्रेम.

४ सूत्र म्हणजे आत्मा.

५९५

अपरिग्रहाच्या सिद्धीसाटीं हिंदुधर्माने होळी-पौर्णिमेची योजना केली आहे.

५९६

कृति उरावी पण कर्ता उरू नये, हें भाग्य उपनिषदाच्या ऋषींचें. अहंकाराचा संपूर्ण नाश झाल्याशिवाय हें होणे नाहीं.

५९७

दोन बिंदु निश्चित झाले कीं सुरेखा निश्चित होते. जीव आणि शिव हे दोन बिंदु कायम केले कीं परमार्थ-मार्ग तयार झाला.

५९८

दैववादात पुरुषार्थाला अवकाश नाहीं म्हणून तो नको. प्रयत्नवादांत निरहंकार वृत्ति नाहीं म्हणून तो नको.

दैववादात नम्रता आहे म्हणून तो पाहिजे. प्रयत्नवादांत पराक्रम आहे म्हणून तो पाहिजे.

५९९

ज्ञान मंत्र आहे. कर्म तंत्र आहे. उपासना दोहोंचा जोड बसवते.

६००

तपाची टोचणी लावू आणि जपाचे नगारे पिटीत राहू तेव्हां च सुप्तात्मा जागा होईल.

६०१

ईश्वराची कला मला कितीशी कळली आहे ? आणि ज्या मला जी काहीं कळली असेल तो 'मी' हि ईश्वराची च कला नव्हे काय ?

६०२

बधत्रय—

१ आधारस्थानीं

विषयाचें नियमन

२ नाभिस्थानीं

आहाराचे नियमन

३ कंठस्थानीं

वाणीचें नियमन.

६०३

श्रीगणेशाय नमः म्हणजे श्रीगुणेशाय नमः.

६०४

मूर्तिपूजेचा अवश्य विधि नाहीं, पण मूर्तिभंगाचा अवश्य निषेध आहे.

६०५

सन्यास आणि योग एका च ज्ञानाग्नीच्या ज्वाला आहेत.

६०६

सूर्य जेथे जातो तेथे प्रकाश घेऊन जातो. तसे च सेवकाचें असलें पाहिजे. सेवक ज्या क्षणीं जेथें जे करीत असेल, त्या क्षणीं तेथें त्या कार्यात त्याचा सेवकपणा त्याच्याबरोबर असला पाहिजे

६०७

श्वासोच्छ्वासाची क्रिया शरीरातील सर्व रंध्रानीं चाललेली असते, पण नाकातून विशेष असते. सत्कर्मे रंध्रांच्या ठिकाणीं म्हटली तर उपासना नाकाच्या ठिकाणीं आहे.

६०८

लोकाच्या सूक्ष्म व्यवहारात अनाहूत लक्ष घालण्याची सेवकाला मनाई आहे.

६०९

जी मूर्ति सर्वोपलभ्य नाही ती मूर्तिपूजेच्या शास्त्राप्रमाणें देवाची 'मूर्ति' होऊ शकत नाही.

६१०

अवतारांची जन्मभूमि, संतांची मृत्युभूमि आणि वीराची कर्मभूमि धन्य होय.

६११

आई ! बालकाच्या कानात एक च आवाज घुमूं दे : आत्मा ! आत्मा ! आत्मा !

६१२

सत्य व्यवहारी अपूर्णांक नाहीं,आध्यात्मिक पूर्णांक आहे.

६१३

निद्रा आणि जागृति ह्या दोहोंचे गुण मिळून समाधि बनते, दोहोंचे दोष मिळून स्वप्न.

६१४

गुण स्वत. प्रमाण. दोष पुराव्याच्या अतीं.

६१५

आत्मा 'न हन्यते'. कारण ?—'न हन्ति'.

६१६

माणसाचा मुख्य धर्म कोणता ?—माणुसकी.

६१७

दार बंद करून कोणी निजला तर सूर्य त्याची सेवा करण्यासाठीं त्याच्या दाराशीं येऊन उभा राहतो. दाराला धक्का देऊन आत शिरत नाहीं. मात्र जरा दार किलकिलें झालें कीं आंत शिरलाच. ही सेवकाची मर्यादा आणि तत्परता.

६१८

भिक्षा म्हणजे ईश्वरावलंबन, म्हणजे समाजाच्या सद्भावनेवर श्रद्धा, म्हणजे यदृच्छा-लाभ-संतोष, म्हणजे कर्तव्य-परायणता आणि फलनिरपेक्ष वृत्ति.

६१९

डोळा सरळ च पाहू शकतो. मनाने डोळ्यापासून शिकावे.

६२०

युक्लिड म्हणतो, दोन बिंदूतील कमींत कमी अंतर म्हणजे त्यांना जोडणारी सु-रेखा. ह्या च अनुभवावर सत्य उभें आहे.

६२१

मनोनिग्रह म्हणजे मानसिक शक्तींचा संग्रह.

६२२

वितळणारे हि थोडे. पण पेट घेणारे त्याहून थोडे.

६२३

'नातिमानिता' हा दैवी संपत्तीचा शेंवटचा गुण सांगितला आहे. मागचे सर्व गुण अंगीं वसत असले तरी अभिमान न वाटणें हा त्याचा अर्थ आहे.

६२४

कोणी म्हणतात, आडात नाहीं ते पोहऱ्यांत कोठून येणार ? मी म्हणतो,

रस्सींत नाहीं तें पोहऱ्यात येतें च कीं नाहीं ?

६२५

आत्मशुद्धीनें विजातीय द्रव्य एक तर बाहेर फेकले जाते अथवा सजातीय बनून आत्मसात् होते.

६२६

अहम् — निश्चित
इदम् — अनिश्चित
तत् — अनन्त

६२७

भ्याड आणि क्रूर एक च.

६२८

उपयुक्ततावाद आपली स्वतःची उपयुक्तता गृहीत च धरतो !

६२९

नदीमध्यें मी देवाची वाहती करुणा पाहतों.

६३०

तात्त्विक— निर्गुण,
आकाशात डोके.

सात्त्विक— सगुण,
भूमीवर पाय

६३१

पारमार्थिक साधनेचा आरंभ आत्मविषादापासून. 'विषादयोगो' नाम प्रथमोऽध्यायः ।

६३२

चित्त धुण्यास उपयोगी—
मृत्तिका—तपस्या
जल —हरिप्रेम

६३३

'तत्' आणि 'त्वम्' ह्यांचा सांधा 'असि' म्हणजे च उपासना, म्हणजे च ज्ञान.

६३४

कोणत्या हि संपूर्ण दर्शनांत खालील तीन विचार अवश्यक आहेत—

१ कार्याकार्य-विचार
२ कार्यकारण-विचार
३ कार्यकर्तृ-विचार

६३५

ज्ञानी पुरुषाच्या 'आभासिक' कर्माचे हेतु—

१ लोकसग्रह

२ प्रारब्ध-क्षय

३ साधना-दार्ढ्य

४ सहजानद

६३६

'हातचा' निखारा गेला म्हणून कोण तकरार करील? संसार 'हातचा निखारा' आहे. तो सोडून पळल्या परमार्थाचा खुशाल पाठलाग करावा.

६३७

कोणी 'माया' म्हणतात, कोणी 'लीला' म्हणतात, कोणी 'स्फूर्ति' म्हणतात. काहीं च न म्हटले तर काय वाईट?

६३८

प्रतिपक्ष-भावनेपेक्षा अ-भावना अधिक परिणामकारक आहे.

६३९

आत्मचिंतन म्हणजे आत्म-शक्तींचें चिंतन. वस्तुतः आत्मा अचिंत्य आहे.

६४०

विनाश हें विकासाचे अपरिहार्य अंग आहे. पण तो प्रयोग ज्याचा त्याने स्वतःवर च करावयाचा.

६४१

प्रेमळ अपरिचयात मी माझा बचाव पाहतों.

६४२

'अहिंसादि प्रकृतीचे गुण कीं आत्म्याचे?'—अहिंसादि प्रकृतीचे गुण नाहींत आणि आत्म्याचे हि 'गुण' नाहींत. ते आत्म्याचे 'स्वभाव-धर्म' आहेत.

६४३

अवतार विश्वमान्य होतो. साधूला कुत्र्याने साथ दिला तर भाग्य म्हणावयाचें.

६४४

कर्म-योग म्हणजे रजोगुण नव्हे. तो रजोगुणावर तोडगा आहे.

६४५

भौतिक ज्ञान अज्ञान नसलें तर ऐश्वर्य असेल. पण तें ज्ञान नव्हे च.

६४६

एक पक्ष—जग साधूसाठीं नाहीं, म्हणून साधूंनीं अलग रहावें.

दुसरा पक्ष—जग साधूसाठीं च आहे, म्हणून साधूनीं धीर धरावा.

भावार्थ, जग साधूसाठीं असो अथवा नसो, साधूनीं साधुत्व केव्हा हि सोडूं नये.

६४७

निर्दोष यज्ञाची अशक्यता नसती तर भक्तीची अवश्यकता नसती.

६४८

तू म्हणतोस—प्रयोगावरून ठरले म्हणून पक्के.

मी म्हणतो—प्रयोगावरून ठरलें म्हणून च कच्चें.

६४९

"मला काय उपयोग?" असें न म्हणता "माझा काय उपयोग?" असे म्हणावे म्हणजे उपयुक्ततावादाचें सार्थक होईल.

६५०

माझी वृत्ति कधीं सन्यासाकडे धाव घेते, तर कधीं भक्तीकडे. वस्तुत. दोहींचा अर्थ एक च आहे.

६५१

जगाचा कर्ता कोण?—

माझ्या जगाचा मी च कर्ता आहें". दुसऱ्या जगाची मला ओळख च नाहीं.

६५२

प्रत्यक्षानें अंध झालेल्या बुद्धीला सनातन सत्यें कशीं दिसणार ?

६५३

विश्वात आत्मा पहावा आणि आत्म्यात विश्व पहावें. ह्याचे नाव स्व-परावलबन

६५४

१ आत्मपरीक्षण
२ मौन
३ कर्मयोग
४ प्रार्थना.

६५५

सद्गुण स्वभावतः च वाहते असतात. सांचलेले सद्गुण दुर्गुणाच्या योग्यतेला येतात.

६५६

हिंसेने राज्य मिळेल, पण स्वराज्य मिळणार नाहीं. स्वराज्य म्हणजे च अहिंसा.

६५७

जातिधर्म, कुलधर्म, राष्ट्रधर्म इत्यादि विहित आहेत. जात्यभिमान, कुलाभिमान, राष्ट्राभिमान इत्यादि निषिद्ध.

६५८

आत्मत्रयी—

पापात्मा, पूतात्मा, परमात्मा,

६५९

प्राप्त कर्म सोडून आवडते निवडण्यात अस्वाद-व्रताचा भंग होतो.

६६०

जेथें शक्ति तुटून पडते त्या शक्तीच्या शेवटच्या टोंकाला परमार्थांत 'यथाशक्ति' म्हणतात.

६६१

जडसृष्टि मायानदीचा विस्तार आहे जीवसृष्टि मायानदीची खोली आहे.

६६२

(१) स्वरूप सोडूं नको. (२) सिद्धान्त सोडूं नको. निदान (३) मर्यादा सोडूं नको.

६६३

प्रत्याहार तिहेरी—

(१) इंद्रियें चिंतनार्थ आवरून ध्यावीं.

(२) भजनार्थ मोकळीं सोडावीं.

(३) जीवनार्थ संयमानें वापरावीं.

६६४

भक्ति चार प्रकारची—

१ परा, २ एका, ३ प्रिया, ४ पूज्या.

६६५

जें अद्वैत नित्यकर्म हि सहन करीत नाही ते च निषिद्ध हि गिळण्यास तयार होतें.

६६६

वैदिक शब्द सूक्ष्म अर्थाचे आहेत. त्यापासून पुढे स्थूल लौकिक अर्थ निघाले सूक्ष्मातून स्थूल, अव्यक्तातून व्यक्त हा सृष्टि-नियम आहे.

६६७

कृष्ण स्वतःला सामान्य गवळ्यासारखा मानीत होता एवढे च नव्हे, तर लोक हि त्याला तसा च मानीत होते आणि मानतात. ह्या दुसऱ्या गोष्टींत कृष्णाच्या अमानित्वाची विशिष्टता आहे.

६६८

देह-बुद्धि सोड
न्यापन-बुद्धि सोड.
रचना-बुद्धि सोड.

६६९

शेतातलें वरवरचे पीक शेतकऱ्याचें, पण जमिनीच्या आतल्या धनावर सर्वांची सत्ता. तसें सामान्य विचारावर त्याच्या मातृभूमीची मालकी, पण असामान्य विचार सर्व जगाच्या मालकीचे.

६७०

जगात दोन महिमे काम करीत आहेत:
(१) सत्य-महिमा आणि (२) नाम-महिमा.

६७१

जगात नीति आणि भक्ति नांदावी हा धर्माचा उद्देश आहे.

६७२

वेद-प्रामाण्य म्हणजे पूर्वपरपरेविषयीं कृतज्ञताबुद्धि आणि नवीन पराक्रमाला स्फूर्तियुक्त मोकळीक.

६७३

काळी घोगडी मला प्रिय आहे. काळ्या घोगडीचा सहवास म्हणजे श्रीकृष्णाचा सहवास.

६७४

कृष्णाने गाय वाचविली. बुद्धानें बकरी वांचविण्याचा प्रयत्न केला.

६७५

'यथेच्छसि तथा कुरु' असें सांगून पुनः 'मामेकं शरणं व्रज' आहे च. स्वतंत्रतेने संयमाला वरावें ह्यात स्वारस्य आहे.

६७६

भक्ति — नियत संयम
मुक्ति — स्वैर संयम

६७७

कर्मात अकर्म हे ज्ञानाचे सगुण लक्षण आहे. अकर्मात कर्म हें ज्ञानाचें निर्गुण लक्षण आहे.

६७८

वाद चार आहेत—

१ दंभवाद
२ अज्ञानवाद
३ भावार्थवाद
४ यथार्थवाद.

६७९

मरतांना घोंगडीवर निजवतात. जीवनांत गरीबी नसली तर निदान मरणांत ती असूं दे.

६८०

साम्राज्यवाद म्हणजे संपत्ति, सत्ता आणि संस्कृति ह्यांची आसक्ति.

६८१

'भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास'—

कोणत्या हि प्रश्नाला एक देह असतो आणि एक आत्मा. भक्त देहाविषयीं स्वाभाविक च उदासीन असतो.

६८२

सद्-गुरु—ज्यांचे 'अस्तित्व' श्रद्धेय आहे.

चिद्-गुरु—ज्याचें 'ज्ञान' परमार्थ-मंडळांत जाणवते.

जगद्-गुरु—ज्याचें 'कार्य' सर्वांना प्रगट आहे.

६८३

ईश्वराची पैतृक सत्ता स्वीकारल्याशिवाय जगांत भ्रातृभाव नांदणार नाहीं.

६८४

संत सूर्यासारखा
शेते पिकवील.
सुधारक अग्नीसारखा
भात शिजवील.

६८५

गोपींना प्रेममूर्ति
द्रौपदीला कारुण्यमूर्ति
अर्जुनाला ज्ञानमूर्ति
व्याधाला क्षमामूर्ति

६८६

उपासना तीन प्रकारची—

१ आत्मपरीक्षणपर—गभीर
२ हरिदर्शनपर—आनदमयी
३ तत्त्वचिंतनपर—शान्त

६८७

उन्मनी—आध्यात्मिक झोप.

प्रबुद्ध —आध्यात्मिक जागृति.

दोन्ही एकमेकींच्या पडताळ्याच्या अवस्था आहेत.

६८८

सामर्थ्य आहे सत्यनिष्ठेचें ।
असेल जयापाशीं तयाचें ।
ह्याचे चि नांव ‘ भगवंताचे ।
अधिष्ठान ’॥

६८९

ऋषींचें दर्शन
तत्त्ववेत्त्याचें ज्ञान
संताचा अनुभव

६९०

"तुम्ही रज्जुसर्पाप्रमाणे 'विवर्त' मानता कीं सुवर्ण-कंकणाप्रमाणें 'परिणाम' मानता ?"

"मी सुवर्णकंकणाप्रमाणे 'विवर्त' मानतो."

६९१

'बुद्धि'-प्रामाण्य हवें. 'अहं'-प्रामाण्य नको.

६९२

स्नान करतांना 'सहस्रशीर्ष' म्हणण्याचा संप्रदाय आहे. त्या वेळीं हजारों जलबिंदूंच्या रूपात सहस्रशीर्ष परमात्मा हजारों हातांनीं मला स्पर्श करीत आहे अशी भावना करावी, म्हणजे जीवभाव धुऊन निघेल.

६९३

पिपीलिका उत्तम गुरु
विहंगम उत्तम शिष्य.

६९४

(१) एकाग्र अद्वैत

जें एकसाधननिष्ठ असल्यामुळें अन्य साधन कल्पू शकत नाहीं.

(२) समंजस अद्वैत

जें एकसाधननिष्ठ असून अन्य साधनांना मान्यता देतें.

(३) सारग्राही अद्वैत

जें साधनसमुच्चयनिष्ठ असतें.

(४) आत्यन्तिक अद्वैत

जें साधनमात्रांत अभेद अनुभवतें.

६९५

जीवन हें विचार, अनुभव आणि श्रद्धा ह्यांचें घनफळ आहे.

६९६

संत गाईसारखे वत्सल आहेत, म्हणून स्वतः तत्त्वज्ञानाचा कडबा पचवून जगाला भक्तिनीतीचें दूध पाजीत असतात.

६९७

उत्साह-वृद्धि, विकार-शमन आणि ज्ञान-परिपोष हीं स्वच्छ निद्रेचीं तीन लक्षणें आहेत.

६९८

अंकुर केव्हां फुटावा हें पेरणाराच्या हातापेक्षां गव्हाला अधिक समजते. फळाची चिंता कर्त्यानें करूं नये. ती करण्यास कर्म समर्थ आहे.

६९९

शिष्टता — अनुकरणीय.

विशिष्टता — चिन्तनीय.

अशिष्टता —– परिहार्य.

७००

वेद स्वभावानें बोलतात.

गुरु उपदेशार्थ बोलतात.

मी जपार्थ बोलतो.

७०१

नेहमीं अपयश येतें ह्यांत आश्चर्य नाहीं. यश म्हणजे समाप्ति. ती नेहमीं कशी येईल ? ती एकदा च यावयाची.

७०२

अहिंसा म्हणजे ढिली सहनशीलता नव्हे आणि असह्य नियमन हि नव्हे.

७०३

दान हें परिग्रहाचें प्रायश्चित आहे, म्हणून त्यांत अभिमानाला अवकाश नाहीं.

७०४

अस्तेय पद्धतीचें नियमन करतें, अपरिग्रह प्रमाणाचें. फलतः दोन्ही एक च आहेत.

७०५

ईश्वरी योजनेतील अपरिग्रहाचे श्वासोच्छ्वास हे उत्कृष्ट उदाहरण आहे.

७०६

ईश्वरार्पण<br>
भूत-सेवा<br>
तप } यज्ञ<br>
नियतभोग<br>
त्याग

७०७

पुण्यवान् देवाजवळ जाऊ शकतो. कारण, तो पुण्यवान् आहे. पापी देवाजवळ जाऊ शकतो. कारण, तो पापी आहे.

७०८

एकदा स्वप्नांत माझ्या पाठीशीं वाघ लागला. मी पळत सुटलो. साधु हि माझ्याबरोबर पळू लागला. थोड्या वेळानें प्रार्थनेची जागा आली. वाघ मागून येत च होता.

साधु प्रार्थनेच्या जागीं बसून गेला आणि मला म्हणाला, "आता ह्यापुढे मी पळत नाहीं, तुझे तू पाहून घे." मी हि कापत कापत पण निश्चयाने त्याच्या जवळ बसलो. इतक्यात वाघ नाहींसा झाला आणि स्वप्न हि गेलें.

७०९

निर्गुण – सगुण
उपास्य – उपासक
मी – तू
सज्जन – दुर्जन
जड – चेतन
हे पाच भेद मावळले म्हणजे सपूर्ण अद्वैत.

७१०

इच्छा, प्रयत्न, कृपा, प्राप्ति.

७११

कर्म > अकर्म
पण, ज्ञान + कर्म = ज्ञान + अकर्म
कारण, ज्ञान = ∞ ( अनन्त )

७१२

वेदान्तासारखा अनुभव नाहीं.
गणितासारखे शास्त्र नाहीं.
रसोईसारखी कला नाहीं.

७१३

गुरु अव्यक्त-मूर्ति आहे. वाटल्यास शब्द-मूर्ति म्हणा.

७१४

देहासक्ति, ज्ञानासक्ति, दयासक्ति.

७१५

चित्तशुद्धिकारक ह्या शिवाय दुसऱ्या कोणत्या हि नात्यानें कर्माकडे पाहणें मला रुचत नाही.

७१६

वारा आपणहून माझ्या खोलींत येतो. सूर्य आपणहून माझ्या खोलींत शिरतो. देव हि तसा च आपणहून भेटणार आहे. माझी खोली मोकळी असू दे म्हणजे झालें.

७१७

देवाचें सौंदर्य, सामर्थ्य, ज्ञान, पावित्र्य, प्रेम निरंतर आठवावें.

७१८

'महत्त्वाकांक्षा'—

किती अल्प वस्तु ही !

७१९

१ बुद्धीची स्थिरता

२ निष्काम सेवा

३ इंद्रिय-निग्रह

४ भक्तीचा जिव्हाळा

५ आत्मज्ञान

६ दैवी संपत्तीचा विकास, आणि

७ संन्यास

ह्या सात अंगानीं धर्म पूर्ण होतो.

७२०

मोकळ्या हवेंत सच्चिदानंदाची भेट होते.

आकाश — सत्

वायु — चित्

तेज — आनंद

७२१

जग निरनिराळ्या रंगाचें बनलेलें आहे. जगांतल्या निरनिराळ्या वस्तु म्हणजे निरनिराळ्या रंगांचे दाट-पातळ प्रकार.

७२२

बुद्धि अमलांत आणणे म्हणजे च बुद्धि ‘चालवणें.’

७२३

भक्ति माय आणि योग बाप असा बेत जमला तर आम्हा मुलाच्या ठिकाणीं ज्ञान सहज च उगवेल. स्त्री-पुरुषाच्या शिक्षणाची दिशा हि ह्यावरून लक्षात येते.

७२४

ब्रह्मचारी म्हणजे स्त्री आणि पुरुष एकस्थ.

७२५

बुद्धि श्रद्धेसारखी दुबळी नाहीं बुद्धि श्रद्धेसारखी बलवान् नाहीं.

७२६

अति दूर पाहणें आणि मुळीं च न पाहणें हे ठेच लागण्याचे दोन उत्तम उपाय आहेत.

७२७

ज्ञानापेक्षा दृष्टि थोर.

७२८

अभय दोन प्रकारानीं आहे : आपण कोणास न भिणें, आणि आपलें कोणास भय न वाटणें. हे दुहेरी अभय मी आकाशाच्या ठिकाणीं पाहतो. आकाशासारखें मला शून्य झाले पाहिजे असा ह्याचा अर्थ होतो.

७२९

कोणता तारा उच्च आणि कोणता खालीं ह्याला जो अर्थ आहे ( म्हणजे मुळीं च नाहीं ) तो च कोणता माणूस उच्च आणि कोणता नीच ह्याला अर्थ आहे. दोन्ही एका च आकाशात भिन्न भिन्न जागीं आहेत एवढे च म्हणावयाचें.

७३०

वस्तूचें स्वरूप क्षणोक्षणीं बदलताना दिसतें ह्याचा अर्थ वस्तु मिथ्या आहे असा नसून वैभवशाली आहे असा समजावा

७३१

वासना नाहींशी झाली म्हणजे सृष्टि दोन्ही अर्थांनीं 'अ-मूल्य' बनते.

७३२

वैराग्यांत वैद्वेष्य गृहीत आहे.

७३३

१ श्रुति ( तत्त्व-सिद्धान्त )

२ स्मृति ( सामाजिक धारा )

३ पुराण ( पूर्व सतांचीं चरित्रे

४ भक्ति ( उपासना )

५ नीति ( अहिंसा-सत्यादि सिद्ध पथ )

हे सर्वधर्मांचे पंचांग आहे.

७३४

व्युत्पत्ति—व्याकरणाचा विषय आहे.

निरुक्ति—हे आध्यात्मिक शास्त्र आहे.

७३५

सेवा व्यक्तीची.

भक्ति समाजाची.

७३६

मनुष्य—घर

गुण — दरवाजा

दोष — भिंती

---

# ग्राम-सेवा-मंडळ, वरधा

पो नालवाडी, जि. वरधा

## —: प्रकाशन :—

पू० विनोबा-कृत—

| | | | मूल्य रु आ | ट. ख आ पै |
|---|---|---|---|---|
| १ | मधुकर | आ ३ री | १—८ | १–९. |
| २ | जीवनदृष्टि | आ २ री | १—८ | १–९ |
| *३ | विनोबाके विचार | | | |
| | पहला भाग | आ २ री | १—८ | २–० |
| | दूसरा भाग | | १—८ | २–० |
| ४ | स्वराज्य-शास्त्र हिंदी, मराठी | आ २री | ०–१० | १–३ |
| ५ | गीता-प्रवचने | | २—८ | २–० |
| ६ | स्थितप्रज्ञ-दर्शन | | १—८ | २–० |
| ७ | उपनिषदाचा अभ्यास | | २—० | १–३ |
| ८ | विचारपोथी, हिंदी | | १—८ | १–६ |
| | ,, मराठी, | आ २ री | १—० | १–६ |
| ९ | मूळउद्योग कातणे मराठी, हिंदी | आ २ री | ०–१० | १–३ |
| १० | गीताध्याय-संगति | | ०—१ | ०–९ |
| ११ | स्वातंत्र्याची प्रतिज्ञा आणि तिचा अर्थ | | ०—४ | ०–९ |
| १२ | गीताई | आ ९ वी | ०—२ | ०–९ |
| १३ | अभंग-व्रते | | ०—६ | ०–९ |
| १४ | ज्ञानदेवाची भजने | आ २ री छापत आहे | ०—० | ०–० |
| १५ | नामदेवाची भजने | आ २ री | ०–१० | १–० |
| १६ | एकनाथाची भजने | | ०—६ | १–० |
| १७ | संतांचा प्रसाद | | ०–१२ | १–३ |
| १८ | ईशावास्योपनिषत् मराठी, हिंदी | | ०—४ | ०–९ |

**श्री० कुन्दर दिवाण कृत—**

| | मूल्य रु. आ. | ट ख. आ. पै |
|---|---|---|
| १ गीता<br>( विनोबाकृत गीताध्याय-संगति के साथ ) | ०—४ | ०—९ |
| २ गीता गीताई | ०—८ | १—० |
| ३ धर्म-पद | ०—१२ | १—६ |
| ४ आश्रम संगीत ( छापत आहे ) | — | — |
| *५ वस्त्रपूर्णा (मराठी) | १—४ | २—० |
| *६ तकली (हिंदी, उर्दू) | १—४ | २—० |
| **श्री० सत्यन कृत—** | | |
| ७ तकली कैसे काते ? | ०—४ | १—० |
| **श्री० मनोहर दिवाण कृत—** | | |
| *८ महारोग (मराठी) | १—० | १—६ |
| *९ कोढ (हिंदी) | ०—१२ | १—६ |
| **श्री० गांधीजी कृत—** | | |
| १० मंगल-प्रभात (मराठी) | ०—४ | ०—९ |

**—आगामी—**

(१) सत्याग्रह व स्वराज्य
(२) ईशावास्य-वृत्ति
(३) तुकारामाची भजने
(४) विनोबा-विचार-धारा

---

**सूचनाः—** (१) पुस्तके प्राय व्ही पी. ने पाठविली जात नाहीत (२) ट. खर्चा शिवाय रजिष्ट्रेशन साठी ८= अधिक पाठवावे.

* अन्य-प्रकाशित